


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या वतीने प्रकाशित होणारें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २३, अंक ३ रा आक्टो.-डिसेंबर १९५०

# ९६



संपादक

रामचंद्र शंकर वाळिंबे

अनुक्रमणिका





## मराठी भाषिकांनो, ध्यानांत ठेवा, विसरूं नका—

येत्या शिरगणतीच्या वेळीं लिहून द्यावयाच्या तक्त्यांत 'मातृभाषा' या सदरांत 'मराठी' असें स्वतः लिहा व आपल्या ओळखीच्या सर्व लोकांना असेंच लिहिण्यास सांगा.



मुद्रकः— मधुकर नारायण चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, लि०,
१९८/१७, सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २.
प्रकाशकः— वा. द्रा. गोखले, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्,
टिळक रस्ता, पुणें २.

अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २३, अंक ३ रा आक्टो.–डिसेंबर १९५०


## संपादकीय टिपणें

बर्नार्ड शॉचा महाराष्ट्रांत अनेक अंगांनी अभ्यास व्हावयास पाहिजे, व इंग्रजी वाङ्मयांत मुरलेल्या मराठी लेखकांनी व प्राध्यापकांनी शॉचें जीवितकार्य, त्याचे विचार व त्याची नाट्यकला यांविषयीं मराठींत लेखन करून शॉची ओळख मराठी वाचकांस करून द्यावयास पाहिजे अशा आशयाचा मजकूर मीं साहित्यपत्रिकेच्या गेल्या, म्हणजे ९५ व्या अंकांत, लिहिला होता. त्यानंतर थोड्याच दिवसांनी 'जी. बी. एस्.' हीं जगत्प्रसिद्ध आद्याक्षरें धारण करणारी महनीय व्यक्ति कायमचीच जवनिकेंत अंतर्धान पावली, आणि १८९२ पासून गेलीं ५८ वर्षे आपल्या अभिजात कोट्यांनी प्रेक्षकांना रिझविणाऱ्या व भल्याभल्यांनाहि सूक्ष्म विचार करावयास भाग पाडणाऱ्या एका थोर नाटककाराला आपण कायमचेच मुकलों आहोंत. शॉच्या मृत्यूनंतर त्याच्या नाट्यविषयक कामगिरीचा आढावा घेणारे जे मराठी लेख गेल्या कांही दिवसांत माझ्या वाचनांत आले त्यांच्यांत शॉच्या नाट्यकलेचें मर्म आविष्कृत झालेलें मला मुळींच दिसून आलें नाही हें मोठ्या खेदाने नमूद करणें भाग आहे. यांपैकी एक लेख इंग्रजीच्या एका नाणावलेल्या प्राध्यापकांनी लिहिलेला आहे. पण सदर लेखांत शॉच्या नाट्यकलेसंबंधीं जें विवेचन प्रा. महाशयांनी केलें आहे तें अत्यंत अपूर्ण व जुजबी स्वरूपाचें आहे. बर्नार्ड शॉला 'नाटककार' ही पदवी द्यावी की न द्यावी असा संदेह अनेक पाश्चात्य टीकाकारांना वेळोवेळीं पडला होता हें मला माहीत आहे. पण या टीकाकारांच्या मतांमुळे भारावून न जातां आपण आपलें स्वतंत्र मत प्रस्थापित करावयास नको काय? ५८ वर्षांपूर्वी शॉने 'विडोअर्स हाउसिस्' हें आपलें पहिलें नाटक लिहिलें. हें नाटक लिहिल्यानंतर शॉच्या मनाचा जसा विकास होत गेला तसाच त्याच्या नाट्यकलेचाहि भरपूर विकास होत गेला. असें जर आहे तर नाटककार या दृष्टीने शॉची योग्यता मोजूं पहाणाऱ्या डोळस टीकाकाराने शॉच्या सर्वोत्कृष्ट नाटकांचाच विचार करावयास नको काय? उदाहरणार्थ 'सेंट जोन,' 'डॉक्टर्स डायलेमा' यासारख्या शॉच्या सर्वोत्कृष्ट नाटकांचा विस्ताराने परामर्श घेऊन

अनुक्रमणिका



मगच त्याच्या नाट्यकलेचें विश्लेषण व्हावयास पाहिजे. पण आमचे ख्यातनाम इंग्रजीचे प्राध्यापक अद्यापि शॉच्या अगदी पहिल्या नाटकांतच घुटमळत आहेत. शॉच्या सुमारें पन्नास नाटकांपैकीं हें एकच नाटक त्यांना उपलब्ध झालें. याचा अर्थ आम्ही काय समजावा? वस्तुस्थिति अशी आहे की शॉ हा केवळ विचारवंत किंवा तत्त्वज्ञ नसून तो एक फार उच्च प्रतीचा नाटककारहि आहे. शेक्स्पियरच्या नाटकांनी ज्यांचे डोळे दिपलेले आहेत अशा टीकाकारांनी त्याच्या नाटकांच्या आधारें जे कलाविषयक सिद्धान्त शोधून काढले त्यांचाच वापर करून शॉचीं नाटकें वाचलीं असतां वैचारिक गोंधळ निर्माण होणें स्वाभाविक आहे. आणि आपल्याकडे हाच गोंधळ आजहि दिसून येत आहे. टीकाक्षेत्रांतील हा गोंधळ नाहींसा करणें हें प्रत्येक प्रामाणिक टीकाकाराचें आवश्यक कार्य आहे. याच दृष्टीने ११ डिसेंबर रोजीं मीं स्वतः प्रा. सत्तिगिरी यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या सभेंत 'नाटककार शॉ' याच विषयावर व्याख्यान देऊन 'शॉ हा नाटककारच नाही' हे अतिरेकी मत खोडून काढलें. तथापि माझ्या एकट्याच्या प्रयत्नाने काय होणार? अनेक जाणत्या टीकाकारांनी अभ्यास करून शॉला विनाकारण झालेल्या असमर्थनीय अन्यायाचें परिमार्जन केलें पाहिजे. यासाठी एखादी व्याख्यानमाला गुंफावी लागली तरी चालेल. शॉच्या सर्वोत्कृष्ट नाटकांपैकी एकएका नाटकावर स्वतंत्रपणें भरपूर चर्चा जेव्हा होईल तेव्हाच शॉच्या नाटकांचे मर्म समजेल. चारदोन पानांत धुडकावून लावतां येण्यासारखी शॉ ही व्यक्ति नाही. त्याने सतत पन्नास वर्षें नाटकें लिहिलीं. आपल्याकडच्या टीकाकारांनी निदान पन्नास दिवस त्याच्या प्रसिद्ध नाटकांचा सूक्ष्म अभ्यास करावा आणि एका नाटकावर एक सबंध व्याख्यान द्यावें.

* * *

येत्या २३ जानेवारीला कै. गडकऱ्यांची पुण्यतिथि साजरी होईल. गेलीं कांही वर्षें या पुण्यतिथीला जें निरुत्साहाचें स्वरूप प्राप्त झालें आहे तें पाहून मन विषण्ण होतें. या बाबतींत कांही तरी महत्त्वाचें नावीन्य निर्माण करतां येणें शक्य नसेल तर ही पुण्यतिथि साजरी करण्यांत काय मतलब आहे तेंच समजत नाही. गडकऱ्यांसारख्या श्रेष्ठ नाटककाराची स्मृति आपण नेहमीच अत्यंत उज्ज्वल ठेविली पाहिजे. पण हजार वेळां उगाळलेल्या त्याच त्याच विषयांवर व्याख्यानें करण्यापेक्षा निराळें कांही तरी होणें आतां जरूर आहे असें मला वाटतें. मी एक सूचना करण्याचा धीर करतों. गडकऱ्यांच्या वाङ्मयांतील संशोधनात्मक अभ्यासाला योग्य असा एखादा महत्त्वाचा विषय निवडून तो एखाद्या अभ्यासकाकडे निदान सहा महिने तरी सोपवावा. या विषयाचा सांगोपांग अभ्यास करून सदर अभ्यासकाने एक प्रबंध लिहून तयार ठेवावा व त्याच्या आधारें स्मृतिदिनाच्या दिवशीं व्याख्यान द्यावें. स्मृतिदिनमंडळाने नंतर हा प्रबंध छापून प्रसिद्ध करावा व जमल्यास व्याख्यात्याला थोडीतरी बिदागी द्यावी. यासाठी लागणारी रक्कम स्मृतिदिनमंडळाने वाटेल ती खटपट करून जमवावी. गडकऱ्यांचे असंख्य चाहते महाराष्ट्रांत आहेत; त्याचप्रमाणें त्यांच्या पुण्याईने ज्यांनी भरपूर पैसा कमावलेला आहे असेहि लोक पुष्कळ आहेत. या सर्वांनी मनांत आणल्यास मी म्हणतों अशी योजना होणें अशक्य खास नाही! गडकऱ्यांची स्मृति उज्ज्वल ठेवण्याचा हा एक महत्त्वाचा उपाय आहे असें मला वाटतें.

* * *

बर्नार्ड शॉने शेक्स्पियरवर कडाडून हल्ला केला होता हें प्रसिद्धच आहे. शॉचे शेक्स्पियरवर आक्षेप तरी कोणते होते हें कळावें यासाठी शॉच्या एका पत्रांतील महत्त्वाचा भाग पुढे देत आहे.—"I have striven hard to open English eyes to the emptiness of Shakespeare's philosophy, to the superficiality and second-handedness of his morality, to his weakness and incoherence as a thinker, to his snobbery, his vulgar prejudices, his ignorence; his disqualifications of all sorts for the philosophic eminence claimed for him...In Tolstoy's estimation, Shakespeare must stand or fall as a thinker, in which capacity I do not think he will stand a moment's examination......"

* * *

लवकरच शिरगणति होणार आहे. यावेळीं मराठीच्या प्रत्येक अभिमानी व्यक्तीने भाषेच्या रकान्यांत मराठीचाच उल्लेख करणें जरूर आहे. पोटभाषेसाठी स्वतंत्र रकाना असला तरी पोटभाषेचा उल्लेख न करिता मराठी हीच आपली भाषा असें नमूद करणें प्रत्येक महाराष्ट्रीयाचें आद्य कर्तव्य आहे. हें कर्तव्य पार पाडण्याच्या बाबतींत झालेली कसूर मराठीच्या उत्कर्षाला विघातक आहे हें प्रत्येकाने ध्यानांत ठेविलें पाहिजे.

* * *

प्रत्येक जिल्ह्यांत भरणारीं विभागसंमेलनें साहित्यपरिषदेच्या कार्याला अत्यंत पोषक आहेत. सोलापूर जिल्ह्याने या बाबतींत गेल्या वर्षांत खरोखरच स्पृहणीय कामगिरी केली आहे. कुर्डुवाडी, मंगळवेढें, बार्शी इत्यादि ठिकाणीं संमेलनें भरवून सोलापूर जिल्ह्याने परिषदेच्या कार्याचा खेडोपाडीं प्रसार करण्याची उत्कृष्ट कामगिरी केली आहे. याबद्दल त्या त्या विभागसंमेलनाचे सर्व कार्यकर्ते धन्यवादास पात्र आहेत. इतर जिल्ह्यांनी या बाबतींत सोलापूरचें अनुकरण अवश्य करावें. बेळगांव व चिपळूण या ठिकाणीं अशीं विभागसंमेलनें लवकरच होणार आहेत.

* * *

म. सा. परिषदेची आर्थिक स्थिति चांगल्या प्रकारें सुधारली तरच परिषदेच्या वतीने होणाऱ्या अनेकविध कार्यांना जोम प्राप्त होईल हें उघड आहे. निरनिराळ्या परीक्षांचें जें उत्पन्न परिषदेला मिळतें तें अलीकडे बरेंच वाढलें असलें तरी परिषदेच्या वाढत्या संसाराच्या दृष्टीने तें अगदी अपुरें आहे. परिषद् बलिष्ठ व्हावी अशी इच्छा बाळगणाऱ्या प्रत्येक सज्जनाने परिषदेचे सभासद वाढविण्याची मनापासून खटपट केल्यास परिषदेला हवें असलेलें आर्थिक स्वास्थ्य लाभेल व अनेक वाङ्मयीन कार्यें तडीला नेण्यास परिषदेच्या कार्यकर्त्यांना उत्साह प्राप्त होईल.

* * *

'ग्रंथपरीक्षण' हा अत्यंत महत्त्वाचा विभाग संपादनाविषयक कांही अपरिहार्य अडचणींमुळे या अंकांत देतां आला नाही याबद्दल मी अत्यंत दिलगीर आहें. या उणीवेची भरपाई पुढील अंकांत जरूर करूं.

— रा. शं. वाळिंबे

---

# सांस्कृतिक चित्रपट

लेखकः— श्री. के. नारायण काळे

करमणुकीचें साधन या दृष्टीने धंदेवाइकांना चित्रपटाचें जितकें महत्त्व वाटतें तितकेंच किंबहुना त्याचें त्याहूनहि अधिक महत्त्व, शिक्षण व संस्कृति यांच्या प्रसाराचें परिणामकारक माध्यम म्हणून विचारवंतांना वाटलें पाहिजे. पण व्यावसायिकांकडून त्याचा जितका किफायतशीरपणें वापर झालेला दिसतो तितका, विचारवंतांकडून त्याचा परिणामकारक उपयोग झालेला मात्र अजून दिसत नाही. पण याचें कारण इच्छेचा अभाव किंवा कलेची उणीव हें नसून, आर्थिक अडचण हें आहे. कथानकप्रधान काल्पनिक चित्रपटनिर्मितीसाठी किफायतशीर व्यवसाय म्हणून भांडवल उभें होऊं शकतें; पण आंतरराष्ट्रीयाच्या शैक्षणिक व सांस्कृतिक प्रामाणिक चित्रपटांच्या निर्मितीला भांडवल कोण पुरविणार ? सांस्कृतिक व शैक्षणिक चित्रपटाच्या विकासाच्या व प्रगतीच्या मार्गांतील ही फार मोठी अडचण आहे आणि ती सहजपणें दूर होण्याचें कांही सुलभ मार्ग उपलब्ध नाहीत. यामुळे या आवश्यक व उपयुक्त अशा उपक्रमाच्या मदतीला धावून येणें हें राष्ट्रीय सरकारचें कर्तव्य ठरतें; व त्यावाचून त्याला तरणोपाय नाही. बहुतेकें पाश्चिमात्य देशांतील सरकारांना याच मार्गाचा अवलंब करावा लागला व भारतीय सांस्कृतिक व शैक्षणिक चित्रपटालाहि सहकारी सहाय्यावाचून गत्यंतर नाही.

सुदैवाने भारत सरकारने याबाबत पुष्कळच उत्साहवर्धक धोरण ठेवलें आहे, यांत शंका नाही. स्वतःचें माहिती व शैक्षणिक चित्रपटांचें खातें आपलें सरकार चालवतें इतकेंच नव्हे, तर खाजगी निर्मात्यांकडून तयार झालेले या प्रकारचे चित्रपटहि, ते विशिष्ट दर्जाचे असतील तर, कांही ठराविक दराने विकत घेऊन ते प्रदर्शित करण्याची व्यवस्था सरकार करीत असतें आणि प्रत्येक चित्रपटगृहांत कांहीं विशिष्ट प्रमाणांत सांस्कृतिक चित्रपटांचें करमणुकीच्या कार्यक्रमांबरोबर प्रदर्शन केलेंच पाहिजे असा नियमहि त्याने केला आहे. हा सरकारी उपक्रम स्तुत्य आणि स्पृहणीय आहे, यांत शंका नाही; पण सध्या ही सर्व व्यवस्था ज्या पद्धतीने होत असते त्यापेक्षा अधिक सुसंबद्ध आणि सुसंघटित पायावर ती होणें जरुर आहे. त्या वाचून ती व्हावी तितकी उपयुक्त व कार्यक्षम होणें शक्य नाही.

पण तशी कांही सुधारणा करण्याचा विचार सरकारी वर्तुळांत असावा असें दिसत नाही. प्रस्तुत सरकारी खातें अस्तित्वांत आलें तें युद्धजन्य परिस्थितीच्या गरजांमधून; आणि पुढे राष्ट्रीय सरकार प्रस्थापित झाल्यावर त्याची पुनर्घटना झाली तीहि कांही विशिष्ट धोरण मनांत ठेवूनच. या धोरणांत शैक्षणिक किंवा सांस्कृतिक घटकापेक्षा विशिष्ट राजकीय विचारसरणीचें मंडन व सत्ताधीश पक्षाच्या कार्यांचा प्रचार यासाठीच चित्रपटाचा वापर करण्याची प्रवृत्ति विशेष प्रमाणांत आढळून येते, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

या धोरणाच्या सूक्तासूक्ततेचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. वस्तुस्थिति कशी आहे, तेवढें नमूद केलें म्हणजे पुरे. या मध्यवर्ती खात्याचें जबाबदार मंत्री पुणें येथे आले असतां, त्या

अनुक्रमणिका

खात्याची कार्यपद्धति अधिक लोकोपयुक्त व लोकमतानुवर्ती करण्यासाठी जनतेच्या तज्ज्ञ प्रतिनिधींचें, चित्रपटनिर्मितीसाठी योग्य, आवश्यक व उपयुक्त असे विषय सुचविण्यासाठी एकादें सल्लागारमंडळ, खात्यातील सरकारी अधिकाऱ्यांना साहाय्यक म्हणून नेमावें अशी सूचना प्रस्तुत लेखकाने त्यांना केली होती; पण ज्या कल्पनेने हें खातें चालू आहे, तिच्या कक्षेत ही सूचना बसत नाही, असा त्यांच्याकडून जबाब मिळाला. वेगवेगळ्या प्रांतांतील मंत्रिमंडळाकडून त्या त्या प्रांताला आवश्यक वाटणाऱ्या विषयाची सूचना केंद्रीय सरकारच्या चित्रपट-निर्मिति खात्याला मिळते व तिला अनुसरून त्या खात्याचा चित्रपटनिर्मितीचा कार्यक्रम आखण्यांत येतो, अशी या केंद्रीय खात्याची कार्यपद्धति आहे. अर्थात् स्वतःच्या प्रांतीय सरकारला काहीहि सूचना करण्याचा मार्ग कोणालाहि मोकळा आहे. मात्र त्या स्वीकारणें किंवा नाकारणें हा सर्वस्वीं त्या सरकारच्या मर्जीचा व सोयीचा प्रश्न आहे. ज्याला विशिष्ट विषयावर शैक्षणिक वा सांस्कृतिक चित्रपट निघावे असें वाटत असेल, त्याला ते काढण्यास प्रत्यवाय नाही आणि सरकारची मर्जी झाल्यास त्यांतील काही सरकार विकतहि घेईल पण कोणते विषय आपल्या विभागाला उपयुक्त किंवा आवश्यक आहेत यांची केंद्रीय निर्मिति विभागाकडे नोंद व्हावयाची ती मात्र अधिकृतपणें प्रांतिक सरकारच्या वतीनेच होणार. खाजगी व्यक्ति किंवा संस्था यांच्या सहकार्याला मध्यवर्ती सरकारच्या चित्रपट निर्मिति खात्याची मान्यता नाही असें या बाबतींतलें धोरण कां असावें, हें समजणें कठीण आहे. यापेक्षा अधिक प्रमाणांत हें खातें लोकमतानुवर्ति करण्याची सध्या तरी केंद्रीय सरकारची तयारी नाही ही खेदाची गोष्ट होय.

एखादी गोष्ट करावयाची तर ती नीटपणें केली तरच ती करण्यांत स्वारस्य. नाही तर ती न केलेलीच बरी असें कित्येक वेळां वाटतें. केंद्रीय खात्याच्या या प्रकारच्या-धोरणामुळे, त्याच्या चित्रपट निर्मितीबद्दल त्यांना योग्य तें श्रेय देऊनहि अनेक वेळां तसें म्हणण्याचा मोह झाल्यावाचून राहत नाही. केंद्रीय खातें सुसूत्रपणें सरकारी उपयुक्ततेच्या आणि प्रचाराच्या दृष्टीनेच केवळ चित्रपटनिर्मिति करीत राहतें, तर एकवेळ असें वाटण्याची पाळी आली नसती; पण सांस्कृतिक व शैक्षणिक चित्रपट काढण्याचा उपक्रमहि तें मधून मधून करीत असतें व तो करीत असताना ज्यांचे सहकार्य, सल्ला व मार्गदर्शन घेणें आवश्यक आहे, त्यांची मात्र तें क्षिती बाळगीत नाही. यामुळे यापेक्षा हे चित्रपट न निघते तर बरें असें ते चित्रपट पाहात असतां मनांत आल्यावाचून राहत नाही. याच दृष्टीने प्रस्तुत लेखकाने उपर्युक्त सूचना केली होती. पण ती विचाराच्या कक्षेतहि बसूं शकत नाही, असें त्याला उत्तर मिळाल्यामुळे पुढे बोलणेंच खुंटलें.

शैक्षणिक व सांस्कृतिक चित्रपटांची निर्मिति हा एक अत्यंत व्यापक आणि विचारणीय असा विषय आहे. वेगवेगळ्या विषयांतील जाणत्या आणि अनुभवी तज्ज्ञांच्या विचार-विनिमयाच्या सहाय्याची या बाबतींतील योजना ठरविण्यासाठी अत्यंत जरूर आहे. आज या संबंधांत जो कार्यक्रम आखला जात असतो त्याच्या पाठीमागे योजना किंवा शास्त्रीय विचार पद्धति यांची कांहीच पार्श्वभूमि दिसत नाहीं. इतर देशात या गोष्टी असतात, म्हणून त्या आपल्या येथेहि केल्या पाहिजेत, यापेक्षा कांही अधिक मूलगामी विचार या बाबतींतील धोरण व कार्यक्रम आखीत असतांना होत असावा असें प्रतीत होत नाही. नाहीतर ज्यांना शिक्षण किंवा संस्कृति याची तोंडओळखहि असल्याचा दाखला त्यांच्या व्यावसायिक चित्रपटनिर्मितीमधून

कधी मिळालेला नसतो, अशा कित्येक चित्रपटनिर्मात्यांकडे ठेकेदारी पद्धतीने विशिष्ट विषयावरील चित्रपटनिर्मितीचें काम सोपाविण्यांत येत असल्याचें दृश्य पुनःपुन्हा दिसलें नसतें व त्यामुळे त्यांच्या निर्मितीत शिक्षण किंवा संस्कृति यांचें नांवापुरतेंहि अस्तित्व न राहतां, त्यांचें ग्राम्य व आचरट विनोदाचें अठरा धान्याचें कडबोळें झाल्याचा शोचनीय देखावा दिसतो तो तरी निखालस टळला असता.

आजच्या कार्यपद्धतींत निर्मितिखातें चित्रपटाचा विषय ठरवितें. आणि ठेकेदार चित्रपटनिर्मात्यांकडून त्यांची चित्रनिर्मिति करून घेण्यांत येते. या पद्धतीच्या सहकार्यांतून जी निष्पत्ति होते, ती धड प्रेक्षकाची करमणूक करूं शकत नाही की शैक्षणिक व सांस्कृतिक मूल्यांच्या अपेक्षेने त्याच्या मनोविकासाची प्रगतिहि करूं शकत नाही. शैक्षणिक व सांस्कृतिक चित्रपट काढण्यासाठी जी सांस्कृतिक व शैक्षणिक मनःप्रवृत्ति व त्या विषयांकडे पाहण्याचा जो विशिष्ट दृष्टिकोण आवश्यक असतो, त्याच्या प्राथमिक पूर्वतयारीचाहि या धंदेवाईक चित्रपट निर्मात्यांच्या ठिकाणीं पूर्णपणें अभाव असतो. व त्यामुळे त्या निष्पत्तींत आवश्यक असलेलें मुलभूत जीवनसत्त्वच तिच्यामध्ये उतरूं शकत नाही.

विद्यार्थ्यांना शिक्षण देण्यासाठी जशी विशिष्ट अध्यापनाने तयार झालेल्या शिक्षकांची आवश्यकता असते तशीच शैक्षणिक व सांस्कृतिक चित्रपट निर्माण करण्यासाठीहि ठराविक प्रकारच्या शैक्षणिक व सांस्कृतिक मनोभूमिकेच्या व कार्यपद्धतीच्या पूर्वतयारीची जरूरी आहे. केवळ छायाचित्रणयंत्राच्या हालचालींचें थोडेसें तंत्र माहीत असलें, नाट्य व अभिनय यांची पुसटशी तोंडओळख असली, आणि चित्रित केलेले वेगवेगळे तुकडे कसे जोडायचे याची जुजबी माहिती असली की शैक्षणिक व सांस्कृतिक चित्रपटनिर्मितीची जबाबदारी स्वीकारण्याला पुरेशी पात्रता आली, अशी घातुक समजूत बऱ्याच ठिकाणीं प्रचलित असलेली दिसते; व त्यामुळे अनेक नवखे, अर्धकचे, हौशी तंत्रविशारद शैक्षणिक व सांस्कृतिक चित्रपट निर्मितीच्या धाडशी उद्योगाला प्रवृत्त होत असलेले आढळतात. थोडक्या भांडवलांत साध्य होणारा हा उपक्रम असल्यामुळे एकाददुसरा चित्रपट ते कसातरी काढूंहि शकतात. आणि हीच त्याची निर्मिति पुढे त्यांच्या लायकीचा दाखला आणि त्यांनी केलेल्या कामाचा पुरावा ठरून, तो पुढे सरकारी चित्रपटनिर्मिति खात्याकडून त्यांना लघुचित्रपटाच्या निर्मितीची ठेकेदारी मिळण्यास पुरा पडूं शकतो. अशा प्रकारचे चित्रपटनिर्माते हा शैक्षणिक व सांस्कृतिक चित्रपटाच्या प्रगतीच्या मार्गातला फार मोठा धोका आहे. शिक्षण हा प्रांतिक विषय असल्यामुळे केवळ शैक्षणिक चित्रपटांची निर्मिति हा केंद्राप्रमाणेंच प्रांतांच्याहि कार्यक्रमाचा भाग होऊं शकतो. तेव्हा सल्लागार मंडळाच्या बाबतींत केंद्रीय खात्याच्या कांहीहि अडचणी असल्या तरी निदान प्रांतिक शैक्षणिक चित्रपटनिर्मिति खात्याने तरी या बाबतींत पुरोगामी आणि सहकारोत्सुक वृत्ति दाखविली तर तें प्रशंसनीय ठरेल; आणि महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें झालें, तर चित्रपटनिर्मितीच्या कार्याशीं ज्यांचा प्रत्यक्ष संबंध आला आहे व त्यांतील तांत्रिक अंगांचा ज्यांना जातीने अनुभव मिळालेला आहे, असे आचार्य अत्रे, श्री. वि. स. खांडेकर, श्री. ग. ल. ठोकळ, प्रा. ना. सी. फडके, श्री. वि. वि. बोकील, प्रा. चिं. वि. जोशी, सौ. मालतीबाई बेडेकर (खरे) इत्यादींसारखे, शिक्षणतज्ज्ञ आणि साहित्यिक अशा उभयविध नात्यांनी ज्यांना मान्यता मिळालेली आहे असे कित्येक विद्वान् सहकार्यासाठी सरकारला आज उपलब्ध आहेत. चित्रपट दिग्दर्शनाच्या व लेखनाच्या

दृष्टीने श्री. विश्राम बेडेकर, श्री. गजानन जहागिरदार, श्री. पार्श्वनाथ आळतेकर इत्यादि सुशिक्षित व शिक्षणप्रेमी व्यक्तींचीं नांवें सहज नजरेसमोर येण्यासारखीं आहेत. असें असतां शैक्षणिक चित्रपट निर्मितीची योजना आखतांना केवळ सरकारी खात्यांतील नोकरवर्गाच्या लाल फितीच्या कार्यक्षमतेवर अवलंबून न राहतां, यांसारख्या मान्यवर विद्वानांच्या सहकार्याची जोड मिळवितां येण्यासारखी कांही योजना करतां आली, तर त्यामुळे त्या निर्मितीच्या गुणांत कांही उणीव न येतां निश्चितपणें भरच पडेल. फक्त या बाबतींत गंभीरपणें विचार करण्याची इच्छा आणि बिनसरकारी व्यक्तींशीं सहकार्य करण्याची तयारी मात्र सरकारी गोटांतील आत्मसंतुष्ट अधिकारी वर्गाच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली पाहिजे. पण तशी ती उत्पन्न होईल अशी आशा बाळगण्यासारखीं कांहीं चिन्हें अजून तरी क्षितिजावर कोठे दिसत नाहीत ! तीं दिसतील तो सुदिन.

शैक्षणिक आणि सांस्कृतिक चित्रपटांचा श्रीगणेशा प्रवासवर्णनात्मक लघुचित्रपटांनी झाला; व या प्रकारच्या चित्रपटांना करमणुकीच्या कार्यक्रमांमधूनहि चांगलीच लोकप्रियता लाभली. त्यानंतर इतर शैक्षणिक सांस्कृतिक विषयांवरहि हळूहळू चित्रपट तयार करण्याचे प्रयोग सुरू झाले आणि लवकरच सांस्कृतिक व शैक्षणिक चित्रपट निर्मिति ही एक स्वतंत्र अशी शाखा म्हणूनच विकसित व्हावयास सुरुवात झाली.

प्रामाणिक सांस्कृतिक चित्रपट व करमणुकीसाठी तयार केलेले काल्पनिक चित्रपट यांमधील मूलभूत फरक त्यांतील रंजकतेच्या प्रमाणांमध्ये नसून त्यांच्या स्वरूपांतील वास्तवतेंत आहे. करमणुकीच्या चित्रपटांतील वास्तवता कलात्मक असते तर सांस्कृतिक चित्रपटांतलि वास्तवता 'प्रमाण'निष्ठ असते. यामुळे सांस्कृतिक चित्रपटनिर्मिति ही मनोरंजनात्मक चित्रनिर्मितीपेक्षा अधिक कठीण व जास्त जबाबदारीची ठरते. चित्रपट सांस्कृतिक असला काय किंवा मनोविनोदनात्मक असला काय, चित्रपट या माध्यमाला अनुरूप व अनुकूल असेल असाच त्याचा विषय असला पाहिजे. त्याची ही प्राथमिक आवश्यकता आहे. पण कथात्मक चित्रपटांप्रमाणेंच सांस्कृतिक चित्रपट निर्मितीचा उपक्रम करतांना अनेक वेळां ही मूलभूत आवश्यकता नजरेआड होते; आणि कोणत्याहि भलत्याच विषयावर चित्रपट तयार करण्याचा मोह निर्मात्यांना अनावर होतो. सांस्कृतिक चित्रपट तयार करण्याची योजना करतांना, ज्यावर चित्रपट तयार करावयाचा तो विषय सांस्कृतिक आहे किंवा नाही, आणि तो चित्रपट या माध्यमाच्या द्वारे परिणामकारक रीतीने मांडतां येण्याला पात्र आहे की नाही, या दोन प्राथमिक मुद्यांचा निर्मात्याने आरंभींच विचार केला पाहिजे. पण निर्माता शिक्षणतज्ज्ञ नसेल तर त्याला पहिल्या मुद्याबाबत निर्णय घेणें दुर्घट होईल आणि तो चित्रपटमाध्यमाचा मुरब्बी नसेल तर त्याला दुसऱ्या बाबीबद्दलची दृष्टि असणें कठीण होईल. सध्याच्या स्थितींत तरी चित्रपट निर्मात्यांचा शिक्षण आणि संस्कृति यांच्याशीं जसा क्वचितच स्नेहसंबंध आढळतो तसाच सुसंस्कृत व सुशिक्षित विद्वानांचाहि चित्रपटतंत्र व कला यांच्याशीं क्वचित्‌च घरोबा दिसतो. यामुळे आपल्याकडे सध्या तरी चित्रपटमाध्यमाच्या दृष्टीने परिपूर्ण आणि शैक्षणिक व सांस्कृतिक अपेक्षांच्या दृष्टीने समाधानकारक असा सांस्कृतिक चित्रपट तयार होणें ही अशक्य नसली तरी बहुतेक असंभवनीय अशीच घटना ठरते.

ही परिस्थिति सहज बदलतां येईल अशी अनुकूलता आपणांला नाही असें नाही. पण आत्मसंतुष्टतेमुळे आत्मपरीक्षण करण्याची आमच्या चित्रपटनिर्मात्यांची तयारी नसते आणि

कोणी चांगल्या हेतूने आणि प्रामाणिक बुद्धीनेहि त्यांच्या कृतींतील दोष त्यांना दाखविले, तर ते दाखविणारा त्यांच्या डोळ्यांत खुपावयाला लागून त्याला नेस्तनाबूद करण्याचे त्यांचे प्रयत्न सुरू होतात. प्रातिनिधिक स्वरूपाची संघटना आणि जाणत्या तज्ज्ञांची देखरेख यांची जोड निर्मितीच्या योजनेला मिळेल, तरच आज इष्ट तो बदल सांस्कृतिक चित्रपटनिर्मितीच्या कार्यक्रमांत होऊं शकेल–पण मांजराच्या गळ्यांत ही घांट कोणी बांधावयाची आणि कशी ? आपले सांस्कृतिक चित्रपट जाणत्यांच्या दृष्टीने सांस्कृतिकहि नाहीत आणि चित्रपटहि नाहीत, हें त्यांच्या निर्मात्यांना कसें पटवून द्यावयाचें ?

शैक्षणिक व सांस्कृतिक चित्रपटांच्या विषयांच्या युक्तायुक्ततेविषयी स्पष्ट कल्पना नसल्यामुळे, चित्रपटाच्या द्वारे परिणामकारक रीतीनें प्रकट होण्यास पात्र नसलेले अनेक विषयहि आज चित्रपटनिर्मितीसाठी निवडलेले आढळतात. गतिमय चित्ररचना हें चित्रपटांचे व्यावर्तक लक्षण आहे. अर्थात् "जादूच्या कंदिला"च्या साहाय्याने चित्रें दाखवून जो विषय सहजपणें सुलभ होण्यासारखा असतो तो चित्रपटासाठी निवडण्यांत कांहीच स्वारस्य नाही व तो त्याला उपयुक्त व पोषक ठरेलच असेंहि नाही. शैक्षणिक चित्रपट अस्तित्वांत आला म्हणून वर्गातील फळा, नकाशे, शिक्षकाचें तोंडी विवेचक वक्तृत्व इत्यादि शैक्षणिक साधन सामुग्रीची उपयुक्तता संपुष्टांत आली असें समजून, प्रत्येक गोष्ट चित्रपटाचा विषय करण्याचा प्रयत्न करणें हें शैक्षणिकदृष्टया अशास्त्रीय होय. जी गोष्ट शिकवावयाची ती शिकणाराला नुसती माहीत होऊन भागत नाही–तर ती त्याला समजून, उमजून, त्याच्या स्मरणांत राहील अशा रीतीने ती त्याच्या जाणिवेंत प्रविष्ट होऊन बद्धमूल होणें आवश्यक असतें. चित्रपटाच्या द्वारे अशा प्रकारचें चिरपरिणामकारक शिक्षण देणें अशक्यप्राय आहे; कारण चित्रपट पाहणाऱ्या प्रेक्षकाची भूमिका तादात्म्याची नसून तिऱ्हाइताची असते. यामुळे अनुभूतीपेक्षा माहिती देण्यासाठीच शैक्षणिकदृष्ट्या चित्रपट अधिक उपयुक्त ठरत असतो. चित्रपटाच्या माध्यमाच्या या प्रकारच्या शक्ति व मर्यादा ओळखूनच त्याचा शिक्षणकार्यात जाणतेपणें वापर होणें जरूर आहे.

चित्रपटाच्या निर्मितीचा हेतु चित्रपटाचें तांत्रिक स्वरूप निश्चित करीत असतो. आणि तो हेतु व त्यानें तदनुषंगिक स्वरूप यांमधील परस्पर संबंधांचें निर्मात्याला यथार्थ रीतीने ज्ञान असणें आवश्यक असतें. सांस्कृतिक आणि शैक्षणिक चित्रपटाच्या कक्षेत अनेक विषयांवरील विविध प्रकारचे चित्रपट येऊं शकतात. सर्वसामान्य उपयुक्तता, विशिष्ट प्रकारची खास उपयुक्तता, शास्त्रीय संशोधन, सर्वसाधारण शैक्षणिक उपयुक्तता, व विशेष प्रकारची शैक्षणिक उपयुक्तता, इत्यादि दृष्टींनी सामान्यतः सांस्कृतिक व शैक्षणिक चित्रपट काढणें नेहमी जरूर पडतें व यांच्या विशिष्ट उपयोगांच्या दृष्टीने त्याचें स्वरूप आणि तंत्र यांची मांडणी करणें आवश्यक ठरतें.

या दृष्टीने सांस्कृतिक चित्रपटांच्या निर्मितीच्या प्रश्नाकडे नजर टाकली तर केवळ सरकारी खात्याच्या द्वारे किंवा ठेकेदारी आणि मक्तेदारी पद्धतीने तें होणें किती धोक्याचें आहे याची जाणीव होईल आणि शिक्षणतज्ज्ञांनी व जाणत्या साहित्यिकांनी त्यांच्याकडे जागरूकपणें लक्ष देणें किती आवश्यक आहे याची कांहीशी कल्पना येईल. या छोट्याशा प्रास्ताविक स्वरूपाच्या लेखाने अशा कांही जबाबदार व्यक्तींचें या महत्त्वाच्या पण नजरेआड राहिलेल्या उपेक्षित विषयाकडे थोडें तरी लक्ष खेचण्याचें कार्य केलें तरी पुष्कळ झालें.

———

# मराठींतील भौतिक शास्त्रीय ग्रंथ

त्र्यंबक गोविंद ढवळे, बी. ए.　　　प्रा. सखारामपंत आपटे, एम्. ए., बी. एस्सी.

मराठींत भौतिक शास्त्रीय ग्रंथ हवेत. पण, ' उग्राद्‌द्विजते हि वाचकमतिः ' ! भौतिक शास्त्रीय ग्रंथ आणि भाषेची नासाडी, असें मात्र होऊं नये !

१. आपल्या या स्वतंत्र भारतांत शास्त्रज्ञ आणि शास्त्रीय कार्यकर्ते यांची फारच वाण आहे असें जाणते लोक वारंवार म्हणतात. ती वाण भरून काढण्यासाठीं शास्त्रीय ज्ञानाचा फैलाव नीटपणें आणि झपाट्यानें झाला पाहिजे. तसा तो होण्यास योग्य आणि विपुल वाङ्मय अवश्य हवें, व या वाङ्मयाची भाषा अर्थात् महाराष्ट्राला मराठी, गुजराथला गुजराथी याप्रमाणेंच असली पाहिजे हें उघड आहे. **स्वभाषेइतकें सहज चटकन् बोध करून देणारें** दुसरें साधन कोणतें ? भौतिक शास्त्रीय ग्रंथ स्वभाषेंत लिहितांना ' भाषा आणि परिभाषा ' या विषयीं एखादें निश्चित धोरण असणें इष्ट आहे. हें धोरण काय असावें या विषयीं पत्रिकेच्या गेल्या अंकांत सामान्यपणें विचार केला. आतां या लेखांत, मराठी भाषेंत कोणत्या प्रकारच्या भौतिक शास्त्रीय ग्रंथांची भर पडावयास पाहिजे, व तशी ती पडत आहे काय, याविषयीं विचार करण्याचें योजिलें आहे. नुकत्याच म्हणजे गेल्या वर्षीं प्रसिद्ध झालेल्या एका ग्रंथाचा परामर्शहि त्याबरोबर घेतां येणार आहे. तो ग्रंथ म्हणजे प्रि. डॉ. कर्वे यांचें प्रांगारिक रसायन-प्रथम पुस्तक* हा होय.

२. शास्त्रांचे **प्रवर्धक** असे कांहीं ग्रंथ असतात. त्यांच्या योगानें शास्त्रवृक्षाला नवी नवी पालवी फुटल्यासारखें होत असतें. तसेंच शास्त्रांचे **प्रसारक** असेहि कांहीं ग्रंथ असतात. त्यांच्या योगानें शास्त्रवृक्षाच्या फुलांचा मोहक सुवास जिकडे तिकडे दरवळेल असें होत असतें. प्रसारक ग्रंथांनाच **लोकार्थीय** ग्रंथ म्हणतां येईल. याशिवाय कांहीं ग्रंथ तिसऱ्याच एका प्रकाराचे असून ते बांधून दिलेल्या शिधोरीसारखे असतात. त्यांना आपण **पाथेय** ग्रंथ म्हणूं. परीक्षार्थी विद्यार्थ्यांना परीक्षेंतून तरून जाण्यास पुरेल इतपत शिधोरी या ग्रंथांतून मिळते. ग्रंथांविषयीं दुसऱ्या एका रीतीनेंहि थोडें बोधप्रद वर्णन करतां येईल. अज्ञान म्हणजे अंधकार, व अंधकारमय स्थिति हीच स्वाभाविक स्थिति, असें मानल्यास तींत तेज आणि प्रकाश हीं उत्पन्न करण्याचें काम ग्रंथांकडे येतें. कांहीं कांहीं ग्रंथांच्या योगानें अफाट अंधकारांत गडप होऊन राहिलेल्या शास्त्रमंदिराच्या एखाद्या कोन्याकोपऱ्यांतून नवी नवी मेणबत्ती पेटविल्यासारखें होतें; जेथे प्रकाश नव्हता तेथे तो पडल्याचें एकदम दिसूं लागतें. इतर कांहीं ग्रंथांचें असें असतें की, जुन्याच तेवत असलेल्या एखाद्या पलित्यावर वा पणतींत

* प्रकाशकः दास्ताने ब्रदर्स पुणें, १९४९ मे; पृष्ठें डेमी अष्टपत्री १७६+८; किंमत ३॥ रु.

पळीभर अधिक तेल टाकल्यासारखें होतें; क्वचित् कोळिष्टक झाडून पणतीची ज्योत अधिक उजळ केल्यासारखेंहि घडतें. क्वचित् असेंहि होतें की त्यांतलीच एखादी पणती आपण उचलून घ्यावी आणि तिच्या उजेडांत परिसरांतील नवी वाट शोधून काढावी अशी स्फूर्ति कोणा विद्योपासकाला होते. तात्पर्य एवढेंच की प्रवर्धक ग्रंथांतून नवीं नवीं संशोधनें मांडलीं जातात; कांही प्रभावी कल्पना सांगितल्या जातात; अभिनव समन्वेषाच्या वाटा दाखविल्या जातात. अशा प्रकारच्या ग्रंथांचे प्रणेते हे शास्त्रसूरीच होत. इतर कांही ग्रंथ असे असतात की त्यांच्यायोगें पूर्वार्जित ज्ञानाचें संगोपन घडतें व शास्त्रार्थांची ठाकठिकीने मांडणी होते. तसेंच त्यांच्याकडून ज्ञानप्रसाराचेंहि काम होत असल्यामुळे नवे नवे अभ्यासू लोक उत्साहाने पुढे येतात व त्यांतून कांहींना समन्वेषाची नवी स्फूर्ति केव्हां केव्हां मिळते. या दुसऱ्या प्रकारच्या ग्रंथांचे लेखक स्वभावाने व कृतीने शास्त्राचे प्रवर्धक नसले तरी, शिक्षक व प्रसारक असतात. तिसऱ्या प्रकारचे ग्रंथ म्हणजे पाथेय ग्रंथ हें वर म्हटलेंच आहे. ते शाळांच्या किंवा विद्यालयांच्या छत्राखाली शाळकरांनीं किंवा परीक्षार्थी लोकांनी पढावयाचे. एवंच, ग्रंथ त्रिविध—प्रवर्धक, प्रसारक आणि पाथेय. आज मराठी भाषेला सर्वच म्हणजे तिन्ही प्रकारच्या ग्रंथांची जरूर आहे; पण त्यांतल्या त्यांत जर विशेष जरूर कशाची असेल तर पहिल्या दोन प्रकारांची. केवळ पाथेय ग्रंथच मिळत राहिले तर दुधाची तहान ताकावर भागवून घेण्यासारखेंच होणार. यासाठीं महाराष्ट्राच्या शास्त्रज्ञांनी विशेषतः त्यांतील धुरीणांनी शास्त्रप्रतिपादक ग्रंथांची निर्मिति व्हावी असें केलें पाहिजे. ग्रंथ असावा **शास्त्रप्रतिपादक.**

३. डॉ. कर्वे यांचा 'प्रांगारिक रसायन–प्रथम पुस्तक' हा ग्रंथ पाथेय ग्रंथाच्या वर्गांत पडतो. सुमारें बारा वर्षांपूर्वी डॉ. कर्वे यांनी An Elemetnary Text-Book of Organic Chemistry हा आपला इंग्रजी ग्रंथ विशेषतः इंटर सायन्सच्या विद्यार्थ्यांकरितां प्रसिद्ध केला, आणि तेव्हापासून त्याच्या सहा आवृत्त्या निघाल्या आहेत. सहावी आवृत्ति मार्च १९४९ मध्ये निघाली आणि लगेच मे मध्ये त्यांनीं त्याचीच सातवी आवृत्ति काढली असें एका अर्थानें म्हणावयास हरकत नाही. मात्र ही सातवी आवृत्ति त्यांनी स्वतःच केलेलें आपल्या इंग्रजी ग्रंथाचें मराठी रूपान्तर किंवा भाषांतर होय. या रूपान्तराच्या कामीं डॉ. रघुवीर यांनी 'नवीनच तयार केलेल्या परिभाषेचा' उपयोग आपण केला आहे असा निर्वाळा डॉ. कर्वे यांनी आपल्या प्रस्तावनेंत दिला आहे. डॉ. कर्वे हे एक नाणावलेले रसायनवेत्ते असून त्यांचे कितीतरी मराठी लेख 'सृष्टिज्ञान' या मासिकांतून प्रसिद्ध झालेले आहेत. शिवाय त्यांचें 'शालोपयोगी रसायनशास्त्र' (१९३५) हें पुस्तकहि प्रसिद्ध आहेच. डॉ. रघुवीर हे एक विख्यात कोशकार आहेत. ते आर्यसंस्कृतीचे कट्टे अभिमानी असून भाषापंडित व बहुभाषाभिज्ञ अशी त्यांची मोठी ख्याति आहे. त्यांनीं इंग्रजी ऑक्सफोर्ड कोशाचे तेरा भाग, वेब्स्टर कोशाचे दोन भाग, आणि इतरहि वाङ्मयीन शास्त्रीय व अर्धशास्त्रीय कोश यांमध्यें आढळणाऱ्या यच्चयावत् इंग्रजी शब्दांना भारतीय–म्हणजे केवळ संस्कृतमय–प्रतिशब्द देणारा आंग्ल–भारतीय महाकोश रचण्याचा संकल्प सोडलेला आहे, व त्यापैकी कांही थोडा अंश त्यांनी प्रकाशितहि केलेला आहे. याप्रमाणें अधीति कर्वे आणि अधीति रघुवीर यांचा हा योग पाहून मणिकांचन योगाची आठवण झाल्यावांचून कशी राहील! शास्त्रीय पुस्तकें– आणि तींहि एकदम उच्च शास्त्रीय शिक्षणाला उपयोगी पडतील अशीं पुस्तकें– लिहिणें व तशींच ती प्रकाशित करणें हें काम सद्यःस्थितींत किती प्रयासाचें आणि आर्थिक दृष्ट्या जोखमीचें आहे याची कल्पना कोणालाहि सहज करतां येईल. हें महाप्रया-

साचें काम हौसेनं अंगावर घेऊन पार पाडलें याबद्दल लेखक आणि प्रकाशक दोघेहि अभिनंदनास पात्र आहेत हे कोणीहि कबूल करील.

४. हें अभिनंदन झालें. पण ग्रंथाचें परिशीलन काळजीपूर्वक करीत असतांना प्रश्न असा मनांत उभा राहतो की मराठीला आज शास्त्रीय पुस्तकें हवींत खरीं, पण त्यांचें स्वरूप काय असावें ? लेखकानें आपल्या परीनें महाप्रयासानें पुस्तक लिहावें आणि मग विद्यार्थ्यांनीं वा प्रौढ जिज्ञासू वाचकांनीं परवडल्यास ( तितका धीर असल्यास ) तें वाचावें, नाहीतर बाजूला सारावें असें होणें ठीक आहे काय ? किंवा असें करणें बरें की, लेखक-वाचक या उभयतांनीहि विचारपूर्वक ठरविलेल्या कांहीं वाङ्मयीन अपेक्षा-आकांक्षा धराव्यात, आणि उभयतांनीहि सहकारितेनें त्या पूर्ण करण्याचा प्रयत्न करावा ?

शास्त्र म्हटलें की शिस्त-विचाराची शिस्त, भाषेची शिस्त, दोन्ही प्रकारची शिस्त-अवश्य आलीच. शिस्त सांभाळण्याकरितां, म्हणजेच विचाराचा आणि भाषेचा उभयविध गबाळपणा ( भोंगळपणा ) टाळण्याकरितां व प्रतिपादन मुद्देसूद होण्याकरितां ( कमींत कमी ) आवश्यक तेवढा भाषेचा कठिणपणा पत्करण्यास वाचकांनी तयार असावें हें कबूल. परंतु लेखकानेंहि विषय मनोरंजक करणें, निदान जागजागीं सोपा वाटेल असें करणें या बाबतींत यत्किंचितहि कसूर करतां कामा नये. ठाकठिकीची शास्त्रीय भाषा यावीच; पण जेथे विषयांचें आकलन चांगलें करून द्यावयाचें, समजूत पाडावयाची तेथे विस्तारपूर्वक, मनमोकळेपणानें, सोप्या भाषेंतच बोललें पाहिजे. खरोखरी लेखक-वाचक यांचें ' मनोगती ऐक्य ' च व्हावयास पाहिजे. अशासारखीं स्थळें ग्रंथांत पुष्कळ असावींत हें इष्ट. अशा स्थळीं वाचकांस रुचेल, पचेल आणि पटेल अशीच भाषा वापरणें हें ग्रंथकारानें आपलें कर्तव्य समजलें पाहिजे. शिष्याला कठोर शब्दांनीं मार्गदर्शन करणें, वेळेवर प्रसंगोपात्त खरमरीत भाषेनें ताडनाहि करणें, या गोष्टी शिक्षकाला कराव्याच लागतात. परंतु हें सर्व कोणत्या शिक्षकाच्या ठिकाणीं विशेषच शोभतें आणि परिणामकारक ठरतें ? ज्या शिक्षकाच्याकडून बहुधा प्रेमळ आणि गोड असेच शब्द नित्यशः ऐकावयाला मिळतात त्याच्या ठिकाणीं ! तद्वतच ग्रंथांचें आहे. परंतु जवळजवळ बहुतेक शब्द अपरिचित, कल्पना नवीन, वस्तु नवीन, जिकडे तिकडे कठोर, खडबडीत, खरखरीत, अशी परिस्थिति; अशा ठिकाणीं वाचक उद्विग्न न होईल तरच आश्चर्य. उग्रादुद्विजते ! ग्रंथकर्त्याचा हेतु मात्र वाचकानें पोटभर ज्ञान सेवन करावें, आणि पुन्हा पुन्हा अधिक अधिक जिज्ञासेनें परत आपणांकडे यावें. पण तो हेतु या उग्रपणाच्या परिस्थितींत कसा सिद्धीस जाणार ?

आधीच परीक्षार्थी विद्यार्थ्यांकरितां लिहिलेलें टिप्पणीवजा पुस्तक आणि त्यांतून मराठीमध्ये भाषांतररूपानें अवतरलेलें; म्हणजे अपेक्षाभंग दुहेरी होतो. आम्हांला वाटतें कीं, असें पुस्तक मराठींतून प्रकाशित होणें म्हणजे गायीच्या ताज्या दुधाची अपेक्षा असणाऱ्या अर्भकासाठीं आटीव विलायती दुधाच्या डब्याची, केवळ लेबलें बदलून आयात करण्यासारखेंच आहे ! अशा आटीव दुधाचीहि अपेक्षा केव्हा केव्हा असते, पण केवळ आपद्धर्म म्हणूनच; दैनंदिन गरजेचें नैसर्गिक पेय म्हणून नव्हे ! खरोखर पाहतां, आज ज्याची आम्हांस नितांत अवश्यकता भासते तें शास्त्रीय वाङ्मय म्हणजे केवळ परीक्षेसाठीं घोकून पाठ करतां येण्याजोगें गोळीबंद वाङ्मय नसून, तें असें असावें की जें वाचीत असतांना भरल्या नदीच्या प्रवाहांतून पाण्याच्या ओघाबरोबर विनासायास तरंगत गेल्याचें अनुभवास यावें आणि

त्या प्रवाहाचा ओघच असा असावा की भोंवरे, खडक, सुसरी इत्यादींसारख्या गोष्टी घाटेंत असल्यास त्यांच्या तावडींतून निसटण्याला झाली तर मदतच व्हावी. हें म्हणत असतांना आमच्या दृष्टीसमोर अमेरिकेंतील शालेय व विद्यालयीन अशा दोन्ही प्रकारच्या विद्यार्थ्यांकरितां लिहिलेलीं कांही नमुनेदार आधुनिक पुस्तकें आहेत. अशा या पुस्तकांतून शास्त्राचा रेखीव मुद्देसूदपणा यत्किंचितहि न दुखावतां, सकृद्दर्शनीं रूक्ष वाटणारा विषय सुद्धा चांगला खुलवून मांडलेला दिसतो. पारिभाषिक संज्ञा वापरल्या जातात त्या सहजपणें येतात. त्यांची उकलहि जागजागीं केलेली आढळते. एकदम एखाद्या वाक्यांत किंवा परिच्छेदांत अनेक पारिभाषिक संज्ञांची गर्दी केली जात नाही. या योगाने वाचकाला आपलें वाचन सफाईने करतां येतें, सहसा अडखळल्यासारखें होत नाही. सर्वसाधारण अमेरिकन वाचकाची शिधोरी आमच्या इकडच्यापेक्षां मुळांतच अधिक सकस असते हें ध्यानांत घेऊनहि आम्हांला असें म्हणावेसें वाटतें की प्रत्येक विषयांतला नवखा वाचक, कोणत्याहि देशांतला असला तरी, प्रारंभीं सारखाच नवखा असतो; आणि अशा नवख्या वाचकाच्या मनांतहि शास्त्रीय विषयाची आवड उत्पन्न करण्याला हीं शास्त्रप्रतिपादक पुस्तकें चांगलींच उपयोगी पडतात. अगदी सूत्रबद्ध वाङ्मय किंवा परीक्षार्थी टिप्पणीवजा वाङ्मय, हीं उपयोगी पडतील; पण केव्हा? जेव्हा आधीच समजलेला विषय आठवणींत ठेवावयाचा आहे किंवा त्याचें स्मरण करून द्यावयाचें आहे तेव्हा! प्राथमिक आकलन किंवा ज्ञानप्रसार या कामीं त्याचा तादृश उपयोग नाही. तात्पर्य, उपयुक्ततेच्या दृष्टीने अशीं पुस्तकें फार तर दुसऱ्या तिसऱ्या पायरीवर बसूं शकतील; पहिलीवर नव्हे. आपल्या देशी भाषांना, सांप्रतकाळीं, पुस्तकें जीं पाहिजे आहेत तीं, इंटरच्या परीक्षेची का असेनात पण, पहिल्या पायरीवरचीं म्हणजे अर्थात् शास्त्रावबोधक आणि चित्तग्राहक अशीं असलीं पाहिजेत. **ग्रंथ असावा शास्त्रप्रतिपादक**—शास्त्र पटवून देणारा.

५. **आमच्या शास्त्रीय पुस्तकांची भाषा जशी ओघवती असावी, तशीच ती शुद्ध मराठी घाटाचीहि** असावी. याविषयीं बहुधा कोणाचें दुमत होऊं नये. विवाद्यता असलीच तर ती परिभाषेच्या प्रश्नापुरतीच असूं शकेल. कारण अशा शास्त्रीय ग्रंथांतून जो विषय मांडावयाचा तो अत्यंत ठाकठीकीनें, परिच्छिन्नपणें, मांडणें हें अगदी क्रमप्राप्त असल्यामुळे परिभाषा निश्चित असणें आवश्यक आहे. परंतु आपल्याकडे अजून परिभाषा रूढत्वाला पोचलेली नाही. मग अशा या अडचणींतून मार्ग कसा काढावा? परिभाषा इंग्रजी, आहे तशीच वापरावी म्हटलें तर भाषेचें स्वरूप अँग्लो–इंडियन बनतें. सर्वस्वीं आपल्या इकडचीच तयार करून वापरावी, आणि प्राथमिक पुस्तकांतून देखील भरपूर शास्त्रीय माहिती देण्याचा प्रयत्न करावा तर ग्रंथाचें स्वरूप अगदींच भयावह बनतें! प्रस्तुतचें पुस्तक हें या प्रकारचेंच एक लहानसें उदाहरण आहे. म्हणूनच आम्हांला येथे विचारासाठी एक प्रश्न उपस्थित करावासा वाटतो. तो असा की, प्रांतीय भाषेंतून शास्त्रीय ग्रंथ लिहितांना लेखकाने आपल्यापुढे कांही मर्यादित ध्येय ठेवणें इष्ट होईल की नाही? प्राण गेला तरी प्राकृत, आंग्ल वा यावनी शब्दांचा–थोडक्यांत संस्कृतेतर शब्दांचा–वापर करणार नाही असें पराकाष्ठेचें ध्येय आजकालच्या भारतीय शास्त्रज्ञाने मनांत ठेवून चालावें कीं काय? कीं या बाबतींत कांही सारासार विवेक करावा? **शास्त्रीय ग्रंथ आपापल्या भाषेंतून लिहावयाचे ते केवळ परकीय वा प्राकृत शब्दांची हकालपट्टी करण्याच्या हेतूने? कीं आपल्या देशांत शक्य तितक्या लवकर शास्त्रीय ज्ञानाचा फैलाव व्हावा या हेतूने?**

६. सर्वस्वीं परकीय शब्द– पारिभाषिक वा अपारिभाषिक– पावलोपावलीं वापरल्याने विषय समजण्याला कठिण जातें. आणि भाषाहि अगदींच हेंगाडी बनते हें खरेंच आहे. हा भाषेचा उत्कर्ष नव्हे, अपकर्षच ! पण म्हणून थेट दुसऱ्या टोकाला जाऊन संस्कृत नवीन आणि अपरिचित असे शब्द जागोजागीं वापरल्याने–आणि ते देखील अशा शब्दांची जरूर नसतांना व असलीच तर जेथल्या तेथे त्यांची उकल करून न दाखवतां वापरल्याने–विषय कसा काय सोपा होऊं शकतो ? हिंदी, मराठी, गुजराती इ. भाषांनी आपापल्या गरजेप्रमाणें संस्कृत भाषेच्या भांडारांतून वेळोवेळीं निरनिराळ्या रकमांची, निरनिराळ्या प्रकारच्या नाण्यांनी, उचल केलेली आहे यांत शंका नाही. पण अशा स्थितींत, त्या त्या भाषेच्या व्यवहारातलेंच खणखणीत नाणें बाजूला काढून अगदी साध्या चिल्लरीसाठी सुद्धा, संस्कृतच्या पेढीवरच हुंडी काढल्याने आतां वळचणीचें पाणी आढ्याला चढविल्यासारखेंच घडणार नाही काय ? हल्लींच्या कृत्रिम शहरी राहाणीमध्यें आपण जमिनीवरचें पाणी उंच ठिकाणावरच्या टाकींत चढवतों तें बहुधा दोन कारणांसाठीं. पाणीपुरवठ्याच्या तलावादिकांच्या पातळीपेक्षा आपल्यां इमारती, दाटीवाटीच्या राहाणीमुळे, अधीक उंचीपर्यंत चढविलेल्या असतात. त्यांना पाणी पुरविण्यासाठीं तरी एक; किंवा, याच कृत्रिम राहाणीमुळे जागोजागीं साचून राहाणारी घाण धुवून काढण्यासाठी उंचीवरून खाली धावणाऱ्या पाण्याचा वेग उपयोगी पडावा म्हणून तरी एक. पण या दोन्ही प्रसंगीं आपण कांहींसें निसर्गाच्या विरुद्ध गेलोसें भासलें तरी, आपल्याला त्या त्या कामीं नैसर्गिक गुरुत्वाचाच उपयोग मुख्यत्वें करावयाचा असतो. याच धर्तीवर संस्कृतनिष्ठ परिभाषेचा किंवा भाषेचा उपयोग देखील शोभेल अशा ठिकाणीं योग्य कार्याकरितां कार्याचें औचित्य व महत्त्व किंवा गांभीर्य जाणून वेळोवेळीं करावा लागेल हें आम्हांला मान्य आहे. पण तो साजेल अशा ठिकाणीं केला तर ठीक. कारण आपणांला आपलें ज्ञान हें मुख्यत्वें प्राकृत भाषांतून, प्राकृत समाजासाठी प्राकृतनिष्ठांकडून प्रसृत करावयाचें आहे. केवळ पंडितांसाठी हा पसारा नव्हे हें विसरून चालणार नाहीं. पंडित काय संस्कृत शिकतील व समजतीलच. पण त्या खेरीज त्यांनी हिंदी, बंगाली, इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, इत्यादि भाषादेखील शिकूं नये असें थोडेंच आहे ? यांतील दोनतीन भाषा तरी ते कामापुरत्या बहुधा शिकतीलच पण आपल्यापुढें त्यांचा प्रश्न आज प्रमुखपणें नाही. प्रश्न आहे तो सामान्यतः मध्यम म्हटल्या जाणाऱ्या जनतेच्या शास्त्रीय शिक्षणाच्या दर्जाचा.

७. म्हणूनच आम्हांला असें म्हणावयाचें आहे की मराठी शास्त्रीय लेखकाने परिभाषेच्या बाबतींत सुद्धा स्वतः बराच विवेक बाळगणें अगत्याचें आहे. प्रत्येक प्रान्तीय भाषेतून यच्चयावत् शास्त्रीय कल्पनांची आणि विचारांची मांडणी घडण्याइतपत ती ती प्रान्तीय भाषा समृद्ध व्हावी हें निःसंशय इष्टच आहे. तरी तें लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं किंवा बृहत्कोशाच्या एखाद्या अवताराबरोबर एकदम प्रत्यक्षांत उतरवितां येण्यासारखें नाहीं. त्यासाठीं नियोजनपूर्वक, क्रमाक्रमाने, मजल दर मजल करीत, शेवटच्या टप्प्यावर दृष्टि ठेवून मार्ग आक्रमावा लागेल. उदाहरणार्थ, सेन्द्रिय रसायन किंवा आर्वेण रसायन अथवा कर्वे यांच्या भाषेंत प्रांगारिक रसायन हाच विषय घेऊं. आमच्या समजुतीप्रमाणें या विषयाच्या मांडणीला ज्या पारिभाषिक संज्ञा लागणार त्यांचे पांच भाग करितां येतील. (१) औपपत्तिक शास्त्रातल्या मूलभूत कल्पना व परिकल्पना इत्यादिकांच्या मांडणीला आवश्यक लागणारा संज्ञा-संग्रह यांत येईल; ( २ ) गुण आणि विशिष्ट क्रिया यांच्या वाचक कांही थोड्या संज्ञा; (३) भांडींकुंडीं, साधन मापकें, इत्यादींकरितां मोजकीं नांवें; ( ४ ) द्रव्य-द्रव्यांतरांना शास्त्रोक्त

नांवें देण्याकरितां लागणारी आवश्यक तेवढी—विशेषतः उपसर्ग-प्रत्ययादि सामग्री; (५) द्रव्य—द्रव्यान्तरांची लौकिक-व्यावहारिक नांवें.

८. आपल्या इकडे कित्येकांची अशी समजूत झालेली दिसते की द्रव्यद्रव्यान्तरांची नांवें म्हणजेच काय तो शास्त्राचा महत्त्वाचा भाग; आणि शास्त्रीय परिभाषा म्हटलें की द्रव्य-द्रव्यान्तरांची नांवेंच त्यांच्या डोळ्यापुढें उभीं राहतात किंवा नाचूं लागतात असें दिसतें. नाही तर "पारिभाषिक शब्द मला विशेषनामांसारखे वाटतात" असें जें कांही लोक म्हणवात तसें ते म्हणतेना. विचारदृष्ट्या पाहिल्यास ही समजूत अर्थातच चुकीची आहे. आमच्या समजुतीप्रमाणें शास्त्राचा खरा गाभा जर कोठे असेल तर तो त्याच्या औपपत्तिक भागांतच असून बाकीचा द्रव्यद्रव्यांतराचा आणि साधनसामग्रीचा पसारा केवळ दुय्यम-तिय्यम महत्त्वाचा असतो. शास्त्राची अभिवृद्धि व्हावयाची असते ती त्या त्या पदार्थांचीं नांवें समजल्यामुळे नव्हे; तर, त्या त्या शास्त्रांतली जी तात्त्विक व मूलभूत विचारसरणी असते तिची नीट समजूत पटल्यामुळे. नांवें काय त्या त्या मार्पेतल्या शब्दांनी जशीं तीं व्यक्त होतील तशींच तीं आकाशांतल्या ताऱ्यांना क्रमांक देतांत त्या पद्धतीनेहि देतां येतील. किंवा आधुनिक ग्रंथालयांतून निरनिराळ्या विषयांतल्या ग्रंथांना दशांश पद्धतीने क्रमांक देतात तशींहि ती देतां येतील. पद्धत समजली म्हणजे झालें. अशा नांवांची रचना आणि त्यांचा वापर व उपयोग थोडा सावकाशीने केला तरी चालण्याजोगें आहे.

९. यास्तव वर जो औपत्तिक भाग म्हणून सांगितला त्याची परिभाषा ठाकठिकीने घडणें किंवा ती घडलेली हाताशीं असणें या गोष्टीलाच प्राथम्य देणें सर्वथैव इष्ट. आतां, वास्तव आणि रसायन या दोहोंनाही एकच तात्त्विक (औपपत्तिक) परिभाषा लागते; व ती मराठी भाषेच्या घाटणीला व अभिवृद्धीला साजेशी आज मराठींत उपलब्ध आहेहि. इतर भाषाभगिनींनासुद्धां हा सारभूत शास्त्रीय परिभाषेचा गाभा उपयुक्त होण्यासारखा आहे. शास्त्रीय—परिभाषा—मंडळाच्या प्रयत्नाने आज सज्ज असलेली परिभाषा सोडून देण्याचें किंवा जणुं ती नाहीच असें समजून चालण्याचें कारण नाही. तथापि तिच्या ऐवजीं दुसरी एखादी अधिक सरस मांडणी मराठींतून उतविण्याचा प्रयोग कोणीं करूं नये असें म्हणण्याचा आमचा आशय नाही. पण परिभाषेच्या क्षेत्रांत एकदम चौखूर धावावयाचें आणि तेंहि केवळ आणि सर्वव्यापी सरसकट संस्कृतनिष्ठेच्या जीवावर आरूढ होऊन धांवावयाचें. असें केल्यास बिचाऱ्या वाचकाची भयंकर फरफट होणार. इतकी की तो साहजिकच मनांत आणल्यावाचून राहणार नाही की " भारतीय वारु म्हणून म्हणतात तो हा प्राणी एकंदरींत उमदा खरा, पण माझ्या उपयोगाला माझें हें भीमथडी तट्टूंच बरें. पोराबाळांनीहि चढावें उतरावें, दऱ्याखोऱ्यांतून दामटावें, संध्याकाळीं माळावर चरणीला सोडावें, फारतर एखादी पेंढी पुढ्यांत टाकावी. दुसऱ्या दिवशीं नोकरीला पुन्हा ताजें तवानें ! "

सारांश, मराठी वाङ्मयाचे जे तीन भागीदार— लेखक, वाचक, व प्रकाशक— या तिघांनीही सहकारितेने लेखन-वाचनाचे निरनिराळे प्रयोग करून, सरस-नीरस ठरवीत ठरवीत उत्तम वाङ्मय उदयास आणून भौतिकशास्त्राचें रोपटें मराठींत बद्धमूल होईल असें केलें पाहिजे. म्हणूनच आम्ही असें इच्छितों की महाराष्ट्रीय रसायन्यांनी त्वरित पुढे येऊन अधीती कर्वे यांच्या ग्रंथाचें स्वतः परिशीलन करून ग्रंथाच्या सुधारलेल्या आवृत्तीचा मार्ग सुकर करून द्यावा. हा सुयोग लवकर येवो.

श्रीलैब्धप्रसरेव वाचकमतिर्युक्त्योपचर्या परम् ।

---

# सांप्रदायिकांचा समन्वयाचा दुराग्रह

**( भगवद्गीतेंतील एका श्लोकाचें विवेचन )**

लेखक—प्रा. रा. वि. ओतुरकर, एम्. ए.

गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत ४६ वा श्लोक पुढीलप्रमाणें आहे :

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥

यावर ज्ञानेश्वरांचें श्लोकाच्या स्पष्टीकरणापुरतें भाष्य पुढीलप्रमाणें आहे :

जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले ॥
तऱ्ही आपण हित आपुलें । तेचि घेणें ॥२६०॥
... ... ... ... ... ...
कां उदकमय सकळ । जऱ्ही झालें असे महीतळ ॥
तऱ्ही आपण घेणे केवळ । आर्तीच जोगे ॥२६२॥
तैसे ज्ञानी जे होती । ते वेदार्थाते विवरिती ॥
मग अपेक्षित तें स्वीकारिती । शाश्वत जें ॥२६३॥

भिडे ज्ञानेश्वरी पृ. ५८

याच श्लोकावर वामन पंडितांच्या **यथार्थदीपिकेंत** पुढीलप्रमाणें टीका आहे :

अर्जुना, एक मोठें तळें । त्यामोवतीं नाना जळें ॥
ती आश्रयेंच त्याच्या सकळे । नाना रूपें पाझरती ॥१००२॥
वापी कूप विहिरे । सर्वत्र तेंचि पाणी पाझरे ॥
ब्रह्मसुखाश्रयें अरे । विषयसुखेंही अवघींच ॥१००३॥
परी जळ तळयाचें पुष्कळ । पूर्ण करी काम सकळ ॥
तैसा ब्रह्मानंद केवळ । पूर्ण करी मनोरथ ॥१००४॥
वापींत केलें स्नान । परी न करवे वस्त्रक्षालन ॥
न पाजवे वापीचें जीवन : तृषिता गाईस आपल्या ॥१००६॥
इत्यादि कार्यें सकळ । तळयामध्यें होतीं सकळ ॥
अक्षोभ्य ज्यांतील जळ । ऐसा ब्रह्मानंद हा ॥१००७॥
विहिरी वापी कूप जळ । तैसे स्वर्गादि विषय सकळ ॥
जे जे जेथें सुखफळ । ब्रह्मानंदी सर्व तें ॥१००८॥

वामन दाजी ओक संपादित यथार्थदीपिका पृ. ९५–९६

या श्लोकाचें **गीतारहस्यांत** पुढीलप्रमाणें स्पष्टीकरण आहे :

चोहोकडे पाण्याचा पूरच पूर झाला असतां विहिरीचा जितका अर्थ किंवा प्रयोजन रहातें (अर्थात् कांहींच काम रहात नाहीं), तितकेंच ज्ञान प्राप्त झालेल्या ब्राह्मणाला सर्व (कर्मकांडात्मक) वेदाचें प्रयोजन असतें (म्हणजे नुसत्या काम्यकर्मरूपी वैदिक कर्मकांडाची त्याला अपेक्षा रहात नाहीं). गीतारहस्य, प्रथमावृत्ति पृ. ६३०.

हा अर्थ देऊन आणखी दोन पृष्ठांत लो. टिळकांनी 'टीकाकारांनीं त्यांतील शब्दाची फुकट ओढाताण' कशी केली आहे तें दाखविलें आहे.

याच श्लोकाचा 'गीतातत्त्वमंजरीं'त श्री. ज. स. करंदीकर यांनीं पुढीलप्रमाणें अर्थ दिला आहे.

(जलपानाची इच्छा करणाऱ्या पुरुषाला जलपानाच्या संबंधांत) सर्व बाजूंनी पाण्यानें तुडुंब भरलेल्या जलाशयाचा जसा (जेवढा) उपयोग होता, तसा (तेवढाच) उपयोग ब्रह्मज्ञानाची प्राप्ती करून घेणाऱ्या ब्राह्मणाला (मुमुक्षूला) सर्व वेदांचा होतो. (कित्ता पृ. ६७)

असा अर्थ देऊन पुनः स्पष्टीकरणार्थ श्री. तात्यासाहेब म्हणतातः

सकृद्दर्शनीं या श्लोकाचा अर्थ असा भासतो कीं सर्वत्र पाणीच पाणी झालें असतां लहानग्या कूपाची जशी आवश्यकता राहात नाहीं, तशीच ब्रह्मज्ञानाची प्राप्ती झालेल्या ब्रह्मनिष्ठाला वेदांची आवश्यकता राहात नाहीं. असा बाह्यतः प्रतीत होणारा अर्थ स्वीकारल्यास त्यायोगानें वेदांना अगदींच गौणत्व येतें म्हणूनच सकृद्दर्शनी ग्राह्य दिसणारा या श्लोकाचा अर्थ ग्राह्य धरतां येत नाहीं.

याच श्लोकाचा श्री. विनोबा भावे हे 'गीताई' मध्ये पुढील प्रमाणें अर्थ लावतातः

सर्वत्र भरलें पाणी तेव्हां आडांत अर्थ जो ।
विज्ञानी ब्रह्मवेत्त्यास सर्व वेदांत अर्थ तो ॥ गीताई, पृ. १५

सेनापती बापट यांचेंहि भाष्य असेंच आहे; ते म्हणतातः

जेवढा लाभ कूपीं हो सर्वत्र जल झालिया ।
तेवढा सर्व वेदांत विज्ञानमय झालिया ॥

श्री गीतासेवक, पृ. १६

याप्रमाणें हाताशीं असलेल्या गीताभाष्यांचे उतारे तुलनात्मक निरीक्षणासाठीं देऊन झाल्यावर माझें म्हणणें थोडक्यांत सांगतों. या टीकाकारांच्या टीकेंत एकवाक्यता नाहीं, हें उघड आहे. या टीकाकारांचे तीन वर्ग पडतात. (१) ज्ञानेश्वर व करंदीकर (२) वामन पंडित आणि (३) टिळक, भावे, बापट. ज्ञानेश्वर व करंदीकर यांच्या मतें गीतेंत वेदांना मोठ्या जलाशयाची उपमा दिलेली आहे. वेदांत सर्व सांगितलेलें असलें तरी ज्ञान्यांनी आपणांस हवा तोच मार्ग स्वीकारावयाचा असतो. हाच अर्थ ज्ञानेश्वरांनी आणखी एक आपल्या पदरची सुंदर उपमा देऊन स्पष्ट केला आहे. ते म्हणतात, 'जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषहि मार्ग दिसती । तरी तेतुलेहि काय चालिजती । सांगे मज ॥२६१॥ म्हणजे 'सूर्य प्रकट झाला असतां सर्वच वाटा उजळतात, पण त्या सर्वच वाटांनीं आपण जावें काय?' सारांश, या उभयतांच्या मतें वेद हे सर्व माहिती देणारे व मार्गदर्शक खरे, परतु त्यांतून ज्ञान्यानें आपणांस हवें तें निवडावयाचें असतें, व तें तो निवडतोहि. ज्ञानेश्वरांनी हा अर्थ वेदांना गौणत्व न आणतां बसविलेला आहे.

वामन पंडितांनीं यथार्थदीपिकेंत जवळ जवळ याच्या उलट प्रकार केला आहे. ते म्हणतात, स्नान करणें, वस्त्रें धुणें, तृषित गाईंना पाणी पाजणें हीं सर्व कामें निरानिराळ्या विहिरी, वापी, कूप इत्यादि जलाशयांत करावीं लागतात; पण एकदा मोठें तळें सापडलें म्हणजे तेथे सर्वच कामें होतात. तसें ' अनंतानंत वेद, ' व ' अनंतानंत सुखभेद जेथें सर्वहि अभेद ' पावतात, त्या ब्रह्मानंदांत सर्वांचाच सुखेनैव समावेश होतो. अनुभवी ज्ञाता या ब्रह्मानंदाचा अनुभव घेत असतो. वामन पंडितांचा अर्थ हा समावेशक पद्धतीचा आहे. एका तळ्यांत सर्वच कामें भागतात. त्याप्रमाणें ब्रह्मानंदांत सर्वच सुखांचा अनुभव ज्ञान्याला घेतां येईल. या अर्थांत वेदांना थोडें गौणत्व आलें आहे यांत शंका नाही. पण तें झाकण्याचा वामन पंडितांनीं मोठ्या कौशल्यानें प्रयत्न केला आहे. वेद हे ब्रह्मानंदाचे भाग होऊन बसल्यावर ब्रह्मानंदाच्या गौरवांत वेदाचा गौरव आपोआपच येतो अशी स्थिति असल्याने वेदांचें गौणत्व सहजच मर्यादित होतें. शाकुंतलाच्या नुसत्या चतुर्थांकाची स्तुति करण्यापेक्षा सर्वच शाकुंतलाचा चतुर्थांक हा एक भाग आहे असें सांगितल्यानें शाकुंतलाचे विशाल गौरव ( मोठेंपण ) चतुर्थांकाच्या गौरवाशीं साहजिकच एकजीव होतें.

टिळक, भावे, बापट प्रभृतींचा अर्थ याहून निराळ्या प्रकारचा आहे. त्यांनी केलेला अर्थ वर दिला आहे. तो स्पष्ट वाचला असतां असें दिसून येईल की, त्यांच्या अर्थामुळे वेदांना गौणत्व येतें; पण ते त्याची पर्वा करीत नाहीत. ते म्हणतात, एकदा सर्वत्र पाणीच पाणी झाल्यावर नुसत्या विहिरीला कोण विचारतो? तसें 'विजानतः ब्राह्मणस्य' म्हणजे ज्ञानी पुरुषाचें आहे. त्यास शाश्वत सुख प्राप्त होत असल्याने तो अशाश्वताची पर्वा करीत नाही. लो. टिळकांनी गीतारहस्यांत या श्लोकाच्या अर्थाबाबत दोन पृष्ठें खर्च केलीं आहेत व त्यांत गीतार्थानें वेदांना गौणत्व येऊं नये म्हणून टीकाकारांनी या श्लोकांतील शब्दार्थांची कशी ओढाताण केली आहे तें दाखवून आपला अर्थच कसा बरोबर आहे तें सिद्ध केलें आहे. श्री. करंदीकरांना स्वतःच्या अर्थांत व लो. टिळकांनी दिलेल्या अर्थांत फरक आढळला नाही, किंवा आढळूनहि त्यांनीं रहस्यकारांशीं आपला मतभेद उकलून सांगितलेला नाही.

वर दिलेल्या तीन प्रकारच्या अर्थांपैकीं टिळक-भावे-बापट प्रभृतींनी लावलेला उपरोक्त श्लोकाचा अर्थ प्रस्तुत लेखकास सयुक्तिक वाटतो. याचें एक महत्त्वाचें कारण असें कीं, या अर्थानें श्लोकांतील शब्दांची मुळीच ओढताण करावी लागत नाही. सरळ शब्दार्थ व वाच्यार्थ यांत एकवाक्यता आहे. ज्ञानेश्वरांनी वेदांना मोठ्या जलाशयाची उपमा दिली आहे, पण मूळ श्लोकांत वेद व उदपान यांचें साम्य कल्पिलें आहे. वेदांचें व 'सर्वतः संप्लुतोदक' उदपान यांचें साम्य कल्पिलेलें नाही. अर्थात् ज्ञानेश्वरांचें वर्णन एरवी कितीहि रसाळ असलें तरी तें गीतेंतील श्लोकाच्या अर्थाला धरून नाही असें म्हणणें प्राप्त आहे. गीता ही वेदाला गौणत्व देते हा गीतेवरील आरोप टाळण्यासाठीं प्रस्तुत श्लोकाच्या बाह्यार्थाऐवजी निराळा अर्थ घ्यावा लागतो, म्हणजे एकप्रकारची ओढाताणच करावी लागते असें श्री. करंदीकरांनी स्वच्छच कबूल केलें आहे. ( किता )

नुसतें शब्दार्थाच्या दृष्टीनेच नव्हे तर पूर्वीच्या संदर्भाच्या दृष्टीनेहि टिळक-भावे-बापट यांनी केलेला या श्लोकाचा अर्थ युक्त आहे. दुसऱ्या अध्यायांत प्रारंभी सांख्य योगाप्रमाणें आत्मा अमर आहे, जें जात आहे तें मृत्यु पावणें अपरिहार्य आहे, तरी याबाबत तूं निष्का-

रण शोक करीत बसल्यास तुझी अकीर्ती होईल (श्लो. ३४) हा विचार भगवंतांनी अर्जुनास सांगून झाल्यावर

'एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां श्रुणु'

असें म्हणून कर्मबंध होणार नाही, म्हणजेच कर्म करीत असतां त्याचें बंधन आपणावर पडणार नाही, अशा प्रकारचा योग भगवंतांनी सांगण्यास सुरुवात केली. त्यांत 'त्रैगुण्यविषया वेदाः निस्त्रैगुण्यो भवार्जुन।' असे स्पष्ट शब्द आहेत. हा श्लोक वाचल्यावर गीतेंत वेदाचा आधिक्षेप केला आहे की नाही याबद्दल संशय घेण्यास खरें म्हटलें तर जरा सुद्धा जागा नाही. वरील वाक्याने जर वेदांचा अधिक्षेप सूचित होत असेल तर तो गीतेस संमत आहे असें कबूल केल्यावाचून सुटका नाही; मग प्राचीन अगर आधुनिक टीकाकार कांहीहि म्हणोत, किंवा वामन पंडितासारखे विद्वान वेदाचा कसाबसा मान राखण्याचा कसाहि यत्न करोत. गीतेस वेदाची अवहेलना अभिप्रेत नाही हें दर्शविण्यासाठी श्री. करंदीकरांनी आपल्या परिश्रमपूर्वक लिहिलेल्या ग्रंथांत ८२४ ते ८२८ पृष्ठावर बरेंच विवेचन केलें आहे. पण त्याने प्रस्तुत लेखकाचें समाधान झालें नाही हें मी श्री. करंदीकर यांना नम्रपणें सांगूं इच्छितों. पण श्री. करंदीकर यांचें लेखन हा या लेखाचा मुख्य विषय नसल्याने हा मुद्दा मी एवढ्यावरच सोडून देतों. ज्या श्लोकांत 'निस्त्रैगुण्य' हो असा उपदेश भगवंतांनी अर्जुनास केला त्याच्याच पुढील श्लोक प्रस्तुत चर्चेचा विषय आहे व त्यांत वेदाला विहिरीची उपमा देऊन विज्ञानी ब्राह्मणाचें सर्वतः संप्लुतोदकाशी साम्य दाखविलेलें आहे. तेव्हा गीतेस वेदांतील या भागाचा अधिक्षेप अभिप्रेत आहे असें स्पष्ट म्हटल्यावाचून गत्यंतर नाही.

जुन्या पठडींतील टीकाकारांमध्यें समन्वय दाखविण्याचें एक मोठें वेड असतें. मोठमोठ्या तपस्वी अभ्यासकांना देखील या वेडाने पछाडलेलें असतें. किंबहुना हा समन्वय सिद्ध करण्यास जे शब्दाचा अधिक कीस पाडतील ते अधिक विद्वान असा जणु संकेतच रूढ झाल्यासारखा दिसतो! वास्तविक गीता ही वेदोत्तर काळांत लिहिली गेली असल्याने वेदांतील कांही अपसिद्धांतांचें किंवा समजुतींचें निराकरण करून नवयुगाच्या पुनर्घटनेची दिशा दाखविणें यांत कांही चूक नाही. गीतेने वेदाला आजिबात डावललें आहे असेंहि नाहीं. पण वेदांतील जेवढ्या भागांत त्रैगुण्यविषय सांगितला आहे तेवढ्यावर आक्षेप घेऊन भगवंतांनी अर्जुनाला 'तूं निस्त्रैगुण्य हो' असें म्हणण्यांत गैर तें काय? या दृष्टीने विचार केला असतां सांप्रदायिक समन्वयवादी टीकाकारांच्या छापेंतून सुटका झालेले (गीतारहस्य, प्रस्तावना पृ. १ पहा) लो. टिळक हे पहिले आधुनिक टीकाकार ठरतात. टीकाकारांच्या टीका कांहीहि असोत, श्लोकाच्या अर्थावर जोर देऊन त्यांत सुसंगति शोधण्याचा यत्न करणें हा लो. टिळक यांचा आधुनिक यत्न मार्टिन ल्यूथरच्या बायबलच्या मूळ अर्थावर जोर देण्यासारखा वाटतो. महाराष्ट्रांत नवयुग निर्माण करण्याचा मान अनेकांच्याकडे दिला जातो. पण गीतार्थाची सांप्रदायिकांच्या हातून सुटका करून गीता ही वेदाचें प्रगत व सुधारलेलें स्वरूप आहे, गीतेने वेदवादरतांवर कोरडे ओढलेले आहेत हें असंदिग्ध शब्दांत दाखविण्याचें कार्य लो. टिळकांनी केलें असें म्हटल्यावाचून गत्यंतर नाही.

गीतेचा अभ्यास हा प्रस्तुत लेखकाच्या व्यासंगाचा विषय नव्हे. परंतु आपल्या नित्य व्यवसायांत विरंगुळा म्हणून या श्लोकाच्या अर्थाचा शोध घेण्याचा अल्प यत्न येथे केला आहे.

———

अनुक्रमणिका

# आंबें-जोगाई आणि मुकुंदराज

लेखक : शं. गो. तुळपुळे

पुणें विद्यापीठ, पुणें.

गेल्या नोव्हेंबर महिन्यांत पुणें येथील डेक्कन कॉलेज रीसर्च इन्स्टिटयूटमधील क्यूरेटर डॉ. मो. गं. दीक्षित व मी असें दोघेजण कांहीं प्राचीन शिलालेखांचे ठसे घेण्यासाठी आंबें-जोगाई येथे गेलों होतों. या निमित्ताने तेथील दासोपंत-देवघराचीहि पाहणी करावी असें मनांत होतें, व त्याप्रमाणें शिलालेखांच्या कामांतून थोडी सवड काढून देवघरांतील दासोपंती काव्यांच्या उपलब्ध हस्तलिखितांचें एक टांचण मला करतां आलें. दासोपंतांचें समग्र काव्य, विशेषतः संपूर्ण गीतार्णव आंबें-जोगाई येथे त्यांच्या देवघरात हस्तलिखित स्वरूपांत सुरक्षित आहे असें अनेकजणांकडून ऐकत होतों तें तितकें खरें नाहीं असें प्रत्यक्ष ग्रंथसंग्रह पाहून वाटलें. मीं तयार केलेल्या टांचणावरून पाहतां देवघरांत दासोपंतांचें सर्व ग्रंथ तर नाहींतच; पण जे कांहीं आहेत तेहि अपूर्णावस्थेंत आहेत. खुद्द 'गीतार्णवा' ची अवस्था पाहिली तर त्याचे कांहीं अध्याय देवघरांतील बाडांत आजिबातच नाहीत व कांहींस गळती लागली असून लौकरच तेहि पहिल्या सदरांत जमा होण्याच्या मार्गांत आहेत. हें टांचण मी लौकरच प्रसिद्ध करीत आहें. आंबें-जोगाईचें मराठी भाषेच्या दृष्टीने तिसरें महत्त्व म्हणजे आद्य मराठी कवि मुकुंदराज यांचा त्या गांवाशीं जोडला जाणारा संबंध. वास्तविक आंबें-जोगाईस जाण्यासाठी निघतांना हा विषय माझ्या मनांत नव्हता. कारण मुकुंदराज हे आंबें-जोगाईचे नव्हत अशा अर्थाचा आलिखित निर्णय संशोधकांनी दिलेला असल्याने तोच माझ्याहि मनांत घर करून होता. परंतु आंबें येथे प्रत्यक्ष गेल्यावर जें पाहिलें त्यावरून या निर्णयाचा फेरविचार करणें अवश्य आहे असें मला वाटूं लागलें. निदान या प्रकरणांतील आंबें-जोगाईची बाजू नव्याने उपलब्ध झालेल्या साधनांसह मांडणें अवश्य आहे अशा भावनेने मी पुढील मजकूर लिहीत आहें. त्यांत आग्रह असा कोणत्याहि प्रकारचा नाहीं.

मराठी भाषेंतील आद्यकवि मुकुंदराज हा एक वादविषय असून अद्यापि तो अनिर्णीत असल्याचें सर्वांना ठाऊकच आहे. हा कवि अति प्राचीन म्हणजे सुमारे ७५० वर्षांमागील असल्यामुळे त्याच्या जन्ममृत्यूचे शक व त्याचें चरित्र: या गोष्टी अज्ञात असणें यांत नवल नाहीं. परंतु मुकुंदराजांचें ठावाठिकाण व त्याच्या ग्रंथरचनेचा तपशील यांविषयींहि आपण अंधारांत चांचपडत असावें ही खरोखरच दुःखाची गोष्ट होय. मुकुंदराजांची कालनिश्चिति त्यांच्या 'विवेकसिंधू'तील सुप्रसिद्ध अशा कालनिदर्शक ओवीवरून[1] थोडीफार करतां येणें

---

१ शके अकरा दाहोत्तरु। साधारण संवत्सरु। राजा शारंगधरु। राज्य करी ॥ ऐसा समयो सर्वोत्तमु। तेथ मुकुंद द्विजोत्तमु। विवेकसिंधु मनोरमु। निर्मिता जाला ॥—अ. ११.

शक्य आहे. थोडीफार म्हणण्याचें कारण या ओव्यांतील शक-संवत्सरांचा मेळ बसत नसल्याने व कांही प्रतींतून तिचा अभाव असल्याने ती प्रमाण मानण्यांत कांही अडचणी येतात. पण मुकुंदराजांची स्थलनिश्चिति करण्यांत याहूनहि अधिक अडचणी येत असून हा प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचा होऊन बसला आहे. 'विवेकसिंधू'त बाणगंगेच्या किंवा वैनगंगेच्या तीरावरील 'प्रसिद्ध' आणि 'मनोहर' अशा अंबानगरीचा व नृसिंहाचा बल्लाळ आणि त्याचा कुमर जैतपाळ यांचे जे उल्लेख आहेत ते संदिग्ध स्वरूपाचे असून त्यामुळे प्रस्तुत विषया-संबंधीं दोन भिन्न मतें मांडलीं गेलीं आहेत. पैकीं 'विवेकसिंधू'त उल्लेखिली गेलेली ही अंबानगरी म्हणजे मध्यप्रांतांतील भंडाऱ्याजवळील वैनगंगेच्या तीरावरील अंभोर नावाचें गांव होय व ह्यावरून पाहतां मुकुंदराज हे नागपूरकडील होत असें एक मत असून त्याचा पुरस्कार कै. भावे, कै. पांगारकर इत्यादि संशोधकांनी केलेला आहे व बळकट अशा विरुद्ध पुराव्याच्या अभावीं आज तें पुष्कळांना मान्यहि आहे. ही विचारसरणी खरी असणें अशक्य नाही. पण या प्रश्नाची जी दुसरी बाजू म्हणजे मुकुंदराज हे आंबें जोगाईचे असण्याची शक्यता तिचा पाठपुरावा करणारीं कांही साधनें मला या प्रवासांत मिळालीं तीं येथे पुढे मांडीत आहें. हीं साधनें कदाचित् अस्सल, अतएव विश्वसनीय नसतीलहि; परंतु त्यांची उपेक्षा करणें हें शास्त्रविरुद्ध असल्याने मी तीं उजेडांत आणीत आहें. आंबें-जोगाईजवळील मुकुंद-राजांची समाधि सर्वश्रुत असून हें अत्यंत रमणीय असें स्थान दासोपंतांच्या समाधीपासून सुमारें अर्ध्या कोसावर एका दरींतील गुहेंत आहे.[1] या दरींतून जयन्ती नांवाची नदी वाहत असून ती आंबें गांवांतून येऊन पुढे जवळच बाणगंगेस मिळाली आहे. 'विवेकसिंधू'त ज्याचा उल्लेख आला आहे त्या जैतपाळाच्या किंवा जयन्तपाळाच्या नांवावरून त्या गांवच्या नदीस जयन्ती हें नांव मिळणें अशक्य नाही ही गोष्ट जातांजातां नमूद करून ठेवावी असें वाटतें. मुकुंदराजांच्या समाधीचें हें स्थान अतिरम्य असून तें ज्ञानेश्वरींतील सहाव्या अध्यायांत आलेल्या आदर्श अशा तपोभूमीच्या वर्णनाची आठवण करून देतें यांत कांही शंका नाही. या दृष्टीने पाहतां ही समाधीची गुहा म्हणजेच मुकुंदराजांचें ध्यानधारणेचें व ग्रंथ-रचनेचें स्थान होय या आंबें-जोगाईत रूढ असणाऱ्या आख्यायिकेंतील सत्यांश ध्यानांत घेण्या-सारखा आहे. या समाधीच्या किंचित् खालच्या अंगास ज्ञानेश्वरांच्या पादुका असून ज्ञानेश्वर हे मुकुंदराजांच्या समाधीच्या दर्शनास येऊन गेल्याचें हें स्मृतिचिन्ह होय असें जें सांगण्यांत येतें तेंहि असंभवनीय नाही. कारण नामदेवादि संतांच्या मेळाव्यांत केलेल्या तीर्थयात्रेंत ज्ञानेश्वरांनी आपणांपूर्वी होऊन गेलेल्या या आद्य संतकवीच्या समाधीचें दर्शन घेणें अगदी साहजिक आहे. मग ती समाधि कोठेहि असो. अर्थात् या साधनावर फार भर देतां येणार नाही. कारण या पादुका ज्ञानेश्वरांच्या पश्चात् पुढे कोणी तरी स्थापन केलेल्या असणेंहि शक्य आहे. निर्णायक साधन असें ज्यास कांही अंशीं म्हणतां येईल असा एक ग्रंथ हस्त-लिखित स्वरूपांत मला आंबें-जोगाईस मिळाला. त्याचें नांव 'योगेश्वरीमाहात्म्य'. हा ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहिलेला असून त्याची रचना मुकुंदराजांच्या नंतर व इस्लामच्या दक्षि-णेवरील आक्रमणापूर्वी झाली असावी असें वाटतें. कारण त्यांत मुसलमानांचा उल्लेख कोठेहि नाही. सुमारे २७०० श्लोकांचा हा ग्रंथ एकूण ३० अध्यायांत विभागलेला असून त्याचा कर्ता अज्ञात आहे. या काव्याच्या चारपांच प्रती आंबेंगांवांत उपलब्ध आहेत. येथील संशोधक

१. सोबत छायाचित्र

श्री मुकुंदराजांची समाधी



( डॉ. मो. गं. दीक्षित यांच्या कृपेने )

अनुक्रमणिका

श्री. रामभाऊ पांडे-कुलकर्णी यांच्या संग्रहीं त्यांनी स्वतः नकललेली एक प्रत असून या संस्कृत ग्रंथाचें मराठी गद्यांत भाषांतरहि त्यांनी करून ठेवलें आहे. हें भाषांतराचें काम त्यांनी शके १८५० मध्ये सुरू केलें व शके १८५९ त संपविलें. म्हणजे एकूण नऊ वर्षे वरील सद्गृहस्थ प्रस्तुत ग्रंथावर मेहनत घेत होते. 'योगेश्वरी–माहात्म्या' चा मुख्य विषय आंबेजोगाईचें स्थळवर्णन असा आहे. या ग्रंथांतील २२ व्या अध्यायांत मुकुंदराजांच्याविषयीं माहिती आली असून ती थोडक्यांत पुढे देत आहें. मुळांतून कांही उतारे द्यावे अशा हेतूनें प्रस्तुत विषयास आधारभूत असे २२ व्या अध्यायांतील कांही श्लोकहि उद्धृत करीत आहें. 'योगेश्वरी–माहात्म्यां' तील मुकुंदराजांविषयींचा कथाभाग थोडक्यांत असा:—

"या जयन्तिका ( आंबें ) नगरींत एकूण सहा सिद्ध प्रसिद्ध असून त्यांपैकीं पहिल्या सिद्धाची म्हणजे बुटीनाथांची समाधि पापविमोचन तीर्थीं आहे. दुसरे सिद्ध पुरुष मुकुंदराज या नांवाचे असून त्यांचा वास सदा घोडदरा गुहेंत असतो. हे एकदा आपल्या गुहेंतून अकस्मातपणें गुप्त होऊन काशीक्षेत्रीं गेले व तेथे त्यांनी कांही काळ घालवला. परंतु जैतपाळ नांवाच्या जैन राजाने सिद्धींच्या मागे लागून साधूंचा छळ आरंभिला आहे हें ऐकतांच मुकुंदराज पुनः जयन्तिका नगरींत प्रकट झाले. या प्रसंगीं एक चमत्कार घडून आला. जैतपाळ राजाने साधूंना चणे भरडण्याची म्हणजे चक्की पिसण्याची शिक्षा दिलेली होती व त्याप्रमाणें यंत्रें म्हणजे जातीं उभारून त्यांचें काम चालू होतें. मुकुंदराजांनी तेथे आल्याबरोबर हें काम थांबवा असें साधूंना सांगितलें व त्याप्रमाणें त्यांनी तें थांबविलें. पण चमत्कार असा, की कोणाचा हात न लागतांहि तीं जातीं आपोआप फिरूं लागून चणे पूर्ववत् भरडले जाऊं लागले. हें अघटित पाहून राजा वरमला व साधूंस बंधमुक्त करून त्याने मुकुंदराजांचे पाय धरिले. या प्रसंगीं त्यांनी जैतपाळास उपदेश देऊन वर 'विवेकसिंधु' आणि 'परमामृत' या आपल्या दोन ग्रंथांचेंहि त्यास निरूपण केलें. मुकुंदराजांचें आगमन होण्यापूर्वी जैतपाळ राजाने नानादेशींच्या विद्वानांना पाचारण करून त्यांजकडून मुकुंदतीर्थावर एक महायज्ञ करविला होता व त्या तीर्थाभोंवतीं यज्ञरक्षणार्थ आपले घोडेस्वार खडे केले होते. हीच 'अश्वदरी' होय. मुकुंदराजांचा निवास समाधिरूपाने याच (अश्वदरींत) किंवा मुकुंदतीर्थावर आहे"—(योगेश्वरी माहात्म्य, अ. २२)

मूळ ग्रंथांतून अवश्य तो भाग पुढें उद्घृत करीत आहें. मुळांतील अशुद्ध रूपें तशींच ठेविलीं आहेत.

" षडशीति सिद्धमुख्यास्ते तेषां प्राधानिकान्श्रुणु ।
आनंदभैरवो नाम्ना **बुटीनाथः** स उच्यते ॥ ४ ॥
**मुकुंदराज** सिद्धश्च द्वितीयः परिकीर्तितः ।...॥ ५ ॥...
षडैते कथिताः श्रेष्ठास्तेषां स्थानानि मे श्रुणु ।
ब्रह्मवाण्या जयंत्याश्च संगमो यत्र वर्तते ॥ ७ ॥...
मुकुंदराज सिद्धश्च मुकुंदे पर्वते स्थितः ॥ ११ ॥
स महान्शीघ्रकार्ये च विप्राणां सुसुखावहः ।
कर्ता सर्वजनैः पूज्यः मनोरथकरः सदा ॥ १२ ॥
**अश्वदर्याः** समीपस्थगुहायां सर्वदा स्थितः ।... ॥ १३ ॥...
मुकुंदराजराजेति स्मरन्तिष्ठति यः सदा ।
मुच्यते सर्वपापेभ्यो भुक्ति मुक्ति च विंदति ॥ १५ ॥

सिद्धः पूर्वगुहायां स वसन्गुप्तो बभूव ह ।
योगधारणया काशीं गत्वा तत्र सदा स्थितः ॥ १६ ॥
ग्रंथान्नानाविधांश्चैव भक्तानुग्रहकाम्यया ।
सर्ववेदांतशास्त्राणां सारमुद्धृत्य सत्तमः ॥ १७ ॥
विवेकसिंधुपरमामृतं स चाकरोत्सुधीः ।
सिद्धानामृषभो योगी मुकुंदः सिद्धराजकः ॥ १८ ॥
साधुपीडां ततो श्रुत्वा जिनपालेन वैकृतां ।
स्वक्षेत्रं पुनरागत्य गुहायां प्रगटोऽभवत् ॥ १९ ॥
जिनपालं विजित्वैवं सन्मते नैव कुंठितम् ।
कृत्वा शिष्यं जयत्पालं साधुमुक्तिकृता तदा ॥ २० ॥"

( यावर रेणुकसिद्धानें ' हा जिनपाळ कोण व त्याने साधूंचा छळ कां केला ? ' असा प्रश्न विचारल्यावरून श्रीशंकराने पुढील हकीकत सांगितली आहे. ती थोडक्यांत अशी. जयत्पाल नांवाच्या जैन राजाने सिद्धि प्राप्त करून घेण्याच्या हेतूने एक मोठा होम करविला व त्यासाठी नाना देशांतून अनेक विद्वानांना पाचारिलें. हा यज्ञ जेथे झाला त्या मुकुंदतीर्थाभोंवती घोडेस्वार उभे केले, व त्यामुळे हें स्थान मुकुंदतीर्थ व अश्वदरी अशा दोही नांवांनी ओळखलें जाऊं लागलें. यज्ञाच्या अंतीं होमकुंडांतून एक तेजःपुंज बालक वर आलें व ' सिद्धिप्राप्त्यर्थ साधुसेवा हेंच एक साधन होय ' असें सांगून तें बालक गुप्त झालें. त्याप्रमाणें राजाने साधूंचा एक मोठा मेळावा बोलाविला व त्यास सिद्धीविषयीं प्रश्न केला. त्यावर सर्व साधूंनी एकमुखाने उत्तर दिलें, कीं जे जितेंद्रिय, कामक्रोधरहित व सदाचारयुक्त आहेत अशा सिद्धांनाच सिद्धि प्राप्त होत असतात. हें उत्तर जयत्पालास मानवलें नाही व त्याने त्या साधूंचा छळ आरंभिला. यापुढील श्लोक मुळांतून देतों— )

"इत्थं वाक्यं समाकर्ण्य साधूनां रेणुकाद्विज ।
जयत्पालस्तु दुर्मेधा सर्वेषां कर्मंमीदृशम् ॥ ६९ ॥
दृष्ट्वा संतप्तक्रुद्धः सन्साधूनां च पृथक् पृथक् ।
दृषद्यंत्राणि चानीय चणकानां च घर्षणे ॥ ७० ॥
नियुक्ताः साधवः सर्वे चावार्थे ते दुरात्मना ।
घघर्षुर्दुःखितास्ते वै चणकांश्च पृथक् पृथक् ॥ ७१ ॥
साधूनां छलनं चक्रे एवं दुष्टो ह्यहर्निशम् ।
ततः कोलाहलो जातः जनानामसकृद्यदा ॥ ७२ ॥
देशे देशे गता वार्ता चतुर्दिक्षु समंततः ॥ ७३ ॥...
तदा योगेश्वरी देवी सस्मारैषां विमुक्तये ॥ ७६ ॥
मुकुंदराजसिद्धं वै यदा विश्वार्तिहारिणी ।
काश्यान्वसन्महायोगी जनेभ्यः साधुपीडनम् ॥ ७७ ॥...
साधूनां मोक्षणार्थे स्वक्षेत्रेऽत्रे पुनरागमत् ।
योगिनीदर्शनं कृत्वा स्वशिष्यैः सह संवृतः ॥ ७९ ॥
गुहायां प्रगटीभूत्वाऽवसन्दान्तो यदृच्छया ।
जयत्पालः साधुवार्तां श्रुत्वा चारमुखात्ततः ॥ ८० ॥

समाहूयाह सिद्धं तु चारं संप्रेष्य सादरम्।
अहो सिद्ध महासिद्ध ...... ॥ ८१ ॥
एतेषां साधुसिद्धानां अवस्थां त्वं प्रपश्य भो।
यदि त्ववेत्स्यसे सिद्धि तर्हि मां दिश यत्नतः ॥ ८२ ॥
न नूनं दिश ते सिद्धिः साध्ववस्थामवाप्नुहि।
इति वाक्यं समाकर्ण्य जयत्पालस्य सत्तमः ॥ ८३ ॥
उवाच क्रोधसंरक्तलोचनो स्फुरताधरः।
रे रे दुष्ट जयत्पाल साधूनामाक्रमाकर ॥ ८४ ॥...
मोचयस्वाद्य साधून्वै सर्वे कर्तास्म्यहं तव।
सिद्धवाक्यं समाकर्ण्य राजा कौतूहलान्वितः ॥ ८७ ॥
दृषद्यंत्रं समानीय वृहच्चाग्रे च स्थापितम्।
तन्मुखे सुमहच्छीघ्रं स्थापयित्वा पलालकम् ॥ ८८ ॥
मूले छिद्रं सचणकपूर्णं कृत्वा च सिद्धकः।
दृषद्यंत्रस्य स्तंभं तु स्वेच्छया स तताड ह ॥ ८९ ॥
करस्थया यष्टिकया दृषद्यंत्र चले मम।
जयत्पालस्य चार्थाय चणकान्घर्ष मेऽज्ञया ॥ ९० ॥
इत्युक्त्वा भूयदा तूर्णीं तद्यंत्रं परिवभ्रमे।
इत्याश्चर्यं समालोक्य मोचयामास सत्वरम् ॥ ९१ ॥
साधून्स्ततो जयत्पालो मुदायुक्तो बभूव ह।
साष्टांगं प्रणिपत्याह सिद्धराजमहामतिम् ॥ ९२ ॥...
इति प्रसादितः सिद्धः जयत्पालेन वै यदा ॥ ९९ ॥
सदयं स विलोक्याह प्रेमनिर्भरया गिरा। ...
(मु० उवाच) तथाऽप्यस्तु जयत्पाल ...... ॥ १०१ ॥...
इति श्रुत्वा वचः साधोः सिद्धिकामविवर्जितः।
भूत्वा स तु जयत्पालः शरणं तं जगाम ह ॥ १११ ॥...
उपदिश्याथ तान्ग्रंथान्विमुक्तये पुराकृतान्।
विवेकसिंधुपरमामृतादीन्मनोरमान् ॥ ११४ ॥....
श्रुत्वा पूर्णा बभूवुस्ते सिद्धसंसेवनादपि।
मुकुंदराजसिद्धश्च भक्तानां सिद्धरूपतः ॥ ११७ ॥
सिद्धिदो दर्शनं दत्वा सर्वेषां कामपूरकः।
गुहायां भासतेऽद्यापि स्थितानां योगरूपधृक् ॥ ११८ ॥

वरील कथानकांतील चमत्कारविषयक भाग विचारांत न घेणेंच बरें. 'योगेश्वरी महात्म्य' या ग्रंथाचें स्वरूप पौराणिक असल्याने त्यांतून कांहीं वजावट ही केलीच पाहिजे. मात्र जैतपाळ राजाने साधूंना दिलेली चणे भरडण्याची शिक्षा व 'अश्वदरी' ची कथा यांत थोडा तरी सत्यांश असावा असें वाटतें. कारण हीं ठिकाणें आंबे-जोगाईजवळ दाखविण्यांत येत असून तेथील लोक आज अनेक वर्षें त्यांना अनुक्रमें 'चणेभरड' व 'घोडदरा' याच नांवांनी ओळखत आहेत. अर्थात् हीं नांवें कोणी कृत्रिम रीत्या ठेवलेली नसून त्यांच्यामागे कांहीं ऐतिहासिक सत्य असलें पाहिजे हें उघड आहे. हीं दोन स्थानें एकमेकांपासून विशेष दूर

नाहीत हेंहि ध्यानांत घेण्यासारखें आहे. तसेंच आंबें ही कलचुरी घराण्याचा एक मांडलिक राजा जैत्रपाळ याची राजधानी असून तो जैन होता हें इतिहासज्ञांस ठाऊक आहे. याचा उल्लेखहि जेम्स बर्जेस याने आंबें-जोगाईवरील आपल्या लेखांत केलेला आहे.[१] वरील ग्रंथांत आलेली हकीगत कै. पांगारकर यांनी एक आख्यायिका म्हणून थोड्याफार फरकानें नमूद करून ठेविली आहे हेंहि लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.[२] कृष्णदयार्णवासारखा पुढे होऊन गेलेला कवीहि मुकुंदराजांवरील आपल्या आरतींत " जैतपाळ भूपतीनें केला दर्शना कोंड । अपरोक्ष बोध वाहे त्यासी घातलें कोंड " असा उल्लेख करतो त्यासहि महत्त्व आहे. ज्या नदीच्या तीरीं ' मनोहर अंबानगरी ' आहे असा उल्लेख येतो त्या नदीचें नांवहि ' विवेकसिंधू ' च्या बहुतेक प्रतींतून ' बाणगंगा ' असें लिहिलेलें आढळतें; व ही बाणगंगा आंबें-जोगाईसच आहे. तसेंच मुकुंदराज अंबानगरीस ' मनोहर ' म्हणतो यासहि फार महत्त्व आहे. आंबें हें गांव त्या काळीं किती संपन्न व अतएव नगर या नांवास कसें पात्र होतें हें त्या गांवीं उपलब्ध झालेल्या ' चौबारा शिळालेखां '[३] तील वर्णनावरून समजेल. हा लेख सिंघण यादवाच्या काळांतील असून त्याचा सेनापति खोलेश्वर याच्या प्रशस्तिपर आहे. आंबें हें या खोलेश्वराचें निवासस्थान, व त्याचें वर्णन प्रस्तुत लेखाच्या प्रारंभीं आलें आहे, तें असें—

" यस्य चां(चा)ब्र(म्र) पुरं ख्यातं न्न(न)गरं भूषणं भुवः
नानाजनपदाकीर्णं नानारामोपशोभितं ॥ ५ ॥
यदन्त-ग्रंमस्तोकं विशालं शालशोभितं ।
उच्चं(च्च) प्राकारपारिखाभूरिभैरवभासुरं ॥ ६ ॥
विचित्रैरत्नकंशैभि ......... मंडितैः ।
हर्यै(र्म्यै)रम्यतरैः शुभ्रैः समंतादुपशोभितं ॥ ७ ॥
स्फुरं(र)न्माणिरणक्षुद्रघंटिकातोरणध्वजैः ।
सौधमस्तकविन्यस्तपताकांदोलनैरपि ॥ ८ ॥
अनंताराधकव्राततपोधनशतावृतैः ।
केदारांबरमाणिक्यसकलेशसुरालयैः ॥ ९ ॥
यत्र भाति नभोबिंबचुंबि लंबोदरालयं ।
चतुःपथे पथश्रांतं(तैः) सार्थैरानिशमाश्रितं ॥ १० ॥
यत्र कुंकुमानिष्यंदसंच सं ... क चत्वराः ।
गृहा मौक्तिकमाणिक्यश्रेणिमद्रंगमालिकाः ॥ ११ ॥
यत्र वाति मरुत्फुल्लपंकजामोदसेदुरः ।
नित्यं शुद्धवधूधैर्यहरस्मराविवर्धनः ॥ १२ ॥ "

एवंवर्णित आम्रपुरांत म्हणजे अंबानगरींत ज्याचा निवास अशा द्विजवरप्रवर खोलेश्वराची प्रशस्ति या पुढील भागांत आली आहे. वरील वर्णनात आम्रपुरास म्हणजेच अंबा-

१. Archæological Survey of Western India, Vol. III, P. 49.

२. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १, पृ. ३९०–३९१

३. Kielhorn : Sanskrit, Pali & Old Canarese Inscriptions ( Epi. Ind. Vol. VII )

३. ग. ह. खरे : द. म. इ. साधनें, खं. १, पृ. ६८–७६.

नगरीस प्रकाशमान, जनपदव्याप्त, उपवनभूषित इत्यादि विशेषणांनी गौरविलें असून त्यांतील गगनचुंबी मंदिरांचा, भव्य प्रासादांचा, त्यांवरील डौलानें डोलणाऱ्या पताकांचा, कुंकुम-संमार्जनाचा, उत्फुल्ल कमलांचा व सौरभयुक्त वायूचा याप्रमाणे संपन्नतेचे द्योतक असे कितीतरी उल्लेख या वर्णनांत आले आहेत. हें वर्णन अंबानगरीचें आहे व मुकुंदराजांनी आपल्या ग्रंथांत 'मनोहर अंबानगरी' असेंच म्हटलें आहे. यावरून दोन महत्त्वाचे मुद्दे उत्पन्न होतात. एक तर मुकुंदराजांसारखा कवि हा एखाद्या खेड्यास 'मनोहर नगरी' अशा अवास्तव नांवानें व्यर्थ गौरविणार नाही असें वाटतें. नागपूर प्रांतांतील ज्या अंभोर गांवाचा संबंध मुकुंदराजाकडे लाविला जातो तें अंभोर मनोहर होतें किंवा आहे तें ठाऊक नाही. परंतु तें गांव नगरी या संज्ञेस पात्र असल्याचा पुरावा इतिहासांत मिळत नाही एवढें मात्र खरें. आजहि अंभोर हें एक खेडेंगांवच आहे, नगर नाही. उलट जोगाईचें आंबें हें एका काळीं एक 'मनोहर' व संपन्न असें नगर किंवा पुर असावें हें दाखविणारे कितीतरी ऐतिहासिक अवशेष त्या गांवांत व आसपास अद्यापहि सापडतात. अर्थात् मुकुंदराजांना 'अंबानगरी' म्हणजे आंबें जोगाईचें अभिप्रेत असावें असें वाटतें. हें एक, व दुसरें म्हणजे या गांवाचा प्राचीन उल्लेख जसा 'आंबें' याच नावानें आढळतो त्याप्रमाणें नागपूर प्रांतातील अंभोर गांवाचा 'आंबें' असा उल्लेख कोठे आढळत नाही. वर दिलेल्या चौबारा शिलालेखांतील आम्रपुर हें संस्कृत ग्रामनाम मुद्दाम बनविलेलें किंवा कृत्रिम म्हणून सोडून दिलें तरी शके १२०० च्या सुमारास रचिल्या गेलेल्या म्हाइंभटकृत 'लीलाचरित्रां'तील[1] पुढील उल्लेख मान्य होण्यासारखा आहे. या चरित्रग्रंथाच्या एकांकांतील १२ व्या लीलेंत एका चांभारास चक्रधरांपासून 'स्थिति' म्हणजे उन्मन्यवस्था प्राप्त होऊन तो 'विचरत विचरत खोल-नाएकाचेया आंबेंया' आला असा स्पष्ट उल्लेख आहे. या उल्लेखांतील खोलनाएक म्हणजे सिंघण यादवाचा सेनापति खोलेश्वर व आंबें म्हणजे चौबारा-लेखांतील आम्रपुर किंवा आजचें जोगाईचें आंबें. खोलेश्वर हा आपल्या शौर्यादि गुणांमुळे इतका प्रसिद्ध झाला होता, की आंबें हें गांव त्याच्या नांवाने म्हणजे खोलनायकाचें आंबें म्हणून ओळखलें जाई ही वस्तुस्थिति इतिहासांत नमूद आहे. अजूनहि त्या गांवांत एक खोलेश्वराचा मठ असून त्या मठांत खोले-श्वराच्या प्रशस्तिपर असा एक शिलालेख उपलब्ध झालेला आहे. या लेखाचा काल शके ११६२ असा आहे.[2] तात्पर्य, आंबें हें ग्रामनाम ज्याप्रमाणें त्याच स्वरूपांत प्राचीन लेखांतून आढळतें तसें अंभोर हें आढळत नाही. व्युत्पत्तिशास्त्राचा कौल घेतल्यास तोहि अंभोऱ्याच्या बाजूने लागणें कठिण दिसतें. अंभोर या नांवाचें व्युत्पादन संस्कृत 'आम्रपुर' व 'अंबापुर' अशा दोन शब्दांपासून होऊं शकतें. पैकीं 'आम्रपुर' अभिप्रेत असणें शक्य नाही; कारण मुकुंद-राजांनी 'अंबानगरी' असें स्पष्टपणें म्हटलें आहे. आतां अंबापुर हें नाव आंबे-जोगाई या गांवास जसें सार्थ ठरेल तसें ते अंभोऱ्यास ठरणार नाही. कारण जोगाई म्हणजे अंबा ही आंबेंगांवास फार पुरातन काळापासून आहे. तशी ती अंभोऱ्यास असल्याचें ऐकिवात नाहीं. अर्थात् अंबेचें म्हणजे जोगाईचें पुर तें अंबापुर ही उपपत्ति सार्थ वाटते. वास्तविक हीहि थोडी कृत्रिमच असून या गांवाचें मूळ नांव आंबें व त्याचें सुसंस्कृत रूप आम्रपुर

१. लीलाचरित्र, भा. १, एकांक, लीला १२ वी. ( संपा० ह. ना. नेने. )
२. James Burgess : Arch. Survey of W. India, Vol. III, pp. 85–92.

किंवा अंबापुर होय असें मानण्याकडे मनाचा कल होतो. अशो. भाषा व इतिहास अशा दोहो दृष्टीनी ' अंबानगरी ' स आंबें हें गाव अंभोऱ्यापेक्षां अधिक जवळ येतें एवढें खरें आंबें या ग्रामनामाचा संबंध अंबा या देवीच्या उपनांवाकडे लागतो असें जें वर म्हटलें तें केवळ कल्पनेने नव्हे. अंबा आणि आंबें यांचा संबंध सूचित करणारें एक साधन या प्रवासांत मला मिळालें आहे. आंबें गांवापासून जवळच जोगाईच्या देवळाच्या मागील बाजूस दासोपंतांच्या समाधीच्या वाटेवर एक शिवलेणें उपलब्ध झालें असून तें योगिनीचें म्हणजे जोगाईचें माहेर या नांवाने ओळखलें जातें. आज बरीच वर्षें या लेण्याचा अर्धा भाग जमिनींत गाडला गेलेला होता तो कांही वर्षांपूर्वी निजामाचे युवराज आंबें-जोगाईस आलेल्या निमित्ताने मोकळा करण्यांत आला. तेव्हा या लेण्यांत एक शिलालेख मिळाला असून तो अद्यापि अप्रसिद्ध व अज्ञातच आहे. त्याचें वाचन परवाच्या मुक्कामांत डॉ. दीक्षित यांनी केलें व एक चांगला ठसाहि घेतला. हा ठसा त्यांच्या वाचनासह लौकरच प्रसिद्ध होईल. या लेखांत दान देणाऱ्यास ' अंबासभाधिष्ठित ' असें म्हटलें असून हें विशेषण दूयर्थी नसलें तरी सूचक खास आहे. अंबेचें म्हणजे देवीचें गांव तें आंबें असा अभिप्राय त्यावरून ध्वनित होत आहे असें वाटतें. अंबा आणि अंभोर यांचा अशा प्रकारचा संबंध जोडून दाखवितां येणार नाही. शिवाय असें, की ' विवेकसिंधू ' तील त्या ओवींत ' बाणगंगा ' या ऐवजी ' वैनगंगा ' असा पाठ धरला तर पुष्कळशा प्रतींतून ' बाणगंगा ' असें रूप आढळत असल्याने ' वैन ' या शब्दाचा ' बाण ' असा अपभ्रंश झाला असें मानणें क्रमप्राप्त होतें. आतां भाषाशास्त्राच्या कोणत्याहि नियमाप्रमाणे ' वैन ' या शब्दाचें ' बाण ' असें रूप होणें शक्य नाही. तेव्हां मूळ पाठ ' बाणगंगेच्या तीरीं ' असाच असावा, व बाणगंगा ही तर अंभोऱ्यास नसून आंबें–जोगाईस आहे. तसेंच ' योगेश्वरी--महात्म्यां ' त उल्लेखिलेलीं घोडदरी व चणेभरड हीं स्थानें जशीं आंबेंगांवानजीक अजूनहि दाखविलीं जातात तशीं तीं अंभोऱ्यात असल्याचें श्रुत नाही. तात्पर्य, मुकुंदराज हे मराठवाड्यांतील आंबें–जोगाईचे असावे, नागपूर प्रांतांतील अंभोऱ्याचे नव्हत असें मानण्याकडे मनाचा कल व्हावा अशा प्रकारचा हा पुरावा आहे यांत कांही शंका नाही.

शंका नाही म्हटलें खरें, पण मनांत कांही शंका येतातच. पहिली अशी. ' योगेश्वरी महात्म्य ' हा ग्रंथ अस्सल कशावरून ? त्याचा कर्ता अज्ञात व रचनाकाल अनिश्चित आहे. शिवाय या ग्रंथाचा एकंदर थाट पौराणिक स्वरूपाचा आहे, ऐतिहासिक स्वरूपाचा नाही हें कबूल केलेंच पाहिजे. दुसरी शंका किंवा आक्षेप असा, की ' बाणगंगेच्या तीरीं । मनोहर अंबानगरी ' हा मुकुंदराजानी केलेला उल्लेख त्याच्या ग्रंथरचनास्थानाचा नसून त्यांच्या गुरूंचे गुरु जे हरिनाथ त्याच्या समाधिस्थळाचा तो उल्लेख आहे व त्यामुळे मुकुंदराज आणि आंबें जोगाई यांचा संबंध जोडण्याचें कामीं तो निरुपयोगी होय असें वाटणें साहजिक आहे. हा आक्षेप एका दृष्टीने कांहीसा बरोबर असला तरी तोच मुकुंदराज हे अंभोऱ्याचे होत या मताविरुद्धहि घेतां येईल हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हरिनाथ व त्यांची परंपरा यांवरून मुकुंदराजांची स्थलनिश्चिति करण्याचा प्रयत्न डॉ. य. खु. देशपांडे[1] यांनी अलीकडे केला आहे; पण तो अबाधित वाटत नाही. कारण, हरिनाथ व त्यांची परंपरा ही मध्यप्रांतांतील आहे असें गृहीत धरून सुद्धा मुकुंदराज हे आंबें जोगाईचे नव्हत असें सिद्ध होत नाही. तेव्हा हरिनाथांवरून

१ नित्वडक निबंध, खं. १, पृ. ७८ ( मध्यप्रांत संशोधन मंडळ, नागपूर )

मुकुंदराजांची स्थलनिश्चिति करण्यापेक्षा ती स्वतंत्ररीत्या करणें अधिक बरें. अशा प्रकारचा प्रयत्न वर केला आहे. परंतु तो निर्णायक मानण्याचें कारण नाही. स्वतः लेखक तो तसा मानीत नाही. आंबे जोगाईचा आणि मुकुंदराजांचा उपर्युक्त संबंध ही या प्रश्नाची एक बाजू झाली; दुसरी असणें शक्य आहे याची जाणीव लेखकास आहे. किंबहुना प्रस्तुत लेखाचा हेतु मत मांडणें हा नसून एक बाजू विचारात घेणें असा आहे. ही बाजू खोटी ठरली तरी त्याचा विषाद वाटण्याचें प्रयोजन नाही. आंबें आणि अंभोरें यांत पक्षपात करण्याचेंहि लेखकास कांही कारण नाही. तीं दोन्ही त्यास सारखींच आहेत. कोणीकडून तरी या आद्य मराठी संतकवीच्या इतिहासावर अधिक प्रकाश पडावा या एकाच हेतूने वरील मजकूर लिहिला आहे.[1]

———

१. मुकुंदराजांविषयी माहिती मिळण्याच्या कामीं आंबे–जोगाई येथील श्री. राजाभाऊ चौसाळकर व श्री. रामभाऊ पांडे–कुलकर्णी या दोन इतिहासप्रेमी सद्गृहस्थांची फार मदत झाली. त्या उभयतांचा मी आभारी आहें. —शं. गो. तु.

# उभी एक मी टेकडी

भकास ह्या माळावरी उभी एक मी टेकडी
आहे भकासपणांत माझी माळावर कडी
नाही दुसरें कोणतें मिरवायास वैभव
येथ अशक्य अशक्य झाड–झुडूप–संभव
पावसाच्या येती सरी. नाहीत ह्या देहा ओठ !
ईश्वराच्या त्या दयेचा घेऊं शकते न घोट !!
अंतरास माझ्या द्यावा तरी कशाने ओलावा ?
कैसा अंकुरित व्हावा हिरवळीचा देखावा ?
येथ बान्धाया मन्दिर आला कोणी न महंत !
परोपरींनी मजला पाठमोरा भगवन्त !!
ऐशी दुर्दैवी सर्वथा कां हो म्हणता मजला ?
कैक सकाळीं जमतो येथ बालकांचा मेळा
दिसें येथून आगळें सूर्योदयाचें सौंदर्य.
झाले पायरी त्यासाठीं. काय कमी हें ऐश्वर्य !

पुणें-मुंबई प्रवास
२–१२–५०

यशवन्त

## वैदर्भी रीतीविषयीं—

श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या नागपूरच्या 'तरुण भारता'च्या यंदाच्या दिवाळी अंकात प्रा. ग. त्र्यं. देशपांडे यांचा 'वैदर्भीरीती'वरील एक लेख प्रसिद्ध झाला आहे. तो विस्तृत व व्यासंगपूर्ण असल्याने त्याचा स्वतंत्र परामर्श घेणें उचित होईल. आज मराठींतील शैलीच्या शास्त्रीय विचारावर पाश्चात्य टीकाशास्त्रांतील styleच्या विवेचनाची छाप पडलेली आहे. त्यामुळे आपल्या संस्कृत साहित्यशास्त्रांतील या विवेचनाची विस्मृति आधुनिक टीकाकारांस पडली आहे. इतकेंच नव्हे तर असें कांही सखोल विवेचन आपल्याकडे पूर्वी झालें असेल ही गोष्ट सुद्धा कांहींस असंभवनीय वाटते. अशांनी हा लेख अवश्य वाचावा.

संस्कृत साहित्यशास्त्रांत वैदर्भी, गौडी, पांचाली, लाटी, अशा चार रीती असल्या तरी वैदर्भीच त्यांत श्रेष्ठ असल्याने तिच्या विवेचनाच्या अनुषंगानेच प्रा. देशपांडे यांनी संपूर्ण रीतिविचार विवेचिला आहे. वामनाने रीतीस प्राधान्य देऊन तें एक काव्यतत्व मानलें. तरी वामनापूर्वी व वामनानंतर रीतिविचार झालेला आहे. विशेषतः कुंतकानें वामनानंतर आपल्या 'सुकुमार मार्ग' विवेचनांत रीतिविचार फैलावून त्याला आजच्या styleच्या विचारांशी समांतर केलें. याविषयीं प्रा. देशपांडे म्हणतातः— 'कुंतकाचें मत हें आजच्या style या तत्त्वाशीं जुळतें दिसतें. आणि म्हणून संस्कृतसाहित्यकारांनाहि style ची कल्पना होती असें म्हणावयास हरकत नाही' (पृ. ४९) ललित लेखनांतील पदरचनेचा संबंध प्रथम रसाशीं आणि लेखकाच्या व्यक्तिमत्त्वाशीं येत असून परिणामरूपाने तो अखेर रसिकांशींहि येतो. कवीची शैली त्याच्या विशिष्ट मनोरचनेची द्योतक असते. त्यामुळे प्रत्येक कवीच्या शैलींत त्याचें म्हणून निराळें वैशिष्ट्य दिसणारच हा styleच्या विचारांतील महत्त्वाचा भाग दण्डी, वामन, आनंदवर्धन, राजशेखर, कुंतक इत्यादिकांनी प्रगट केला आहे हें प्रा. देशपांडे यांनी त्यांचीं वचनें देऊन सिद्ध केलें आहे.

'संस्कृतांतील रीतिविचार स्वयंपूर्ण असून 'वैदर्भी' ही कालिदासादींनी उपयोजलेली रीतीच सर्वश्रेष्ठ होय' हा प्रा. देशपांडे यांच्या निबंधाचा निष्कर्ष आहे. परंतु हा एकच हेतु प्रथमपासून स्पष्टपणें नजरेसमोर ठेवून परमतनिराकरणपूर्वक त्याची सिद्धि करणें हें धोरण या लेखांत जाणिवेने सांभाळलें नसल्याने सदर लेख आपाततः ऐतिहासिक संकलनासारखा वाटतो. रीतींच्या निव्वळ ऐतिहासिक महत्त्वापेक्षा त्यांचे आजच्या शैलीविचारांतलें मार्गदर्शकत्वच मराठी वाचकांस अधिक जिव्हाळ्याचें वाटत असल्यानें तशाप्रकारचें विवेचन निबंधांत हवें होतें. पाश्चात्य styleच्या विचारांतील मर्म देऊन त्याच्याशीं संस्कृत रीतिविचार तोलून दाखवावयास पाहिजे होता. व तें विवेचन मराठींतील उदाहरणांनी स्पष्ट करावयास पाहिजे होतें. तसेंच रीति विचारांत ज्या गुणांना सर्वांत महत्त्व जास्त त्या गुणांची स्वतंत्र मानसशास्त्रीय कल्पनाहि या निबंधांत दिलेली दिसत नाही. गुण हे रसांशी कसे संबद्ध आहेत हें त्यांनीं स्वतंत्रपणें दाखविलें पाहिजे होतें व निदान संस्कृतांतील तरी कालिदास, माघ, भारवि, भवभूति, श्रीहर्ष, जगन्नाथ इत्यादि कवींच्या रीती त्यांच्या त्यांच्या व्यक्तिमत्त्वानुरूप कशा आहेत याचें विवेचन त्यांनी करावयास हवें होतें. तथापि आहे या रूपांत सुद्धा प्रा. देशपांडे यांचा हा निबंध मराठी वाचकांस कांही अंशीं मार्गदर्शक होणारा आहे. त्यात प्रगट झालेली देशपांडे यांची व्यासंगी वृत्ति व त्यांचें संस्कृत साहित्यशास्त्रावरील प्रभुत्व निःसंशय अभिनंदनीय आहे.

—के. ना. वाटवे.

# कांही अभंग*



( १ )

घनदाट छाया पसरे मेघांची ।
चिन्हें वादळाचीं । उमटलीं
कडाडती विजा, जाती आरपार ।
भेदून अंबर । तडातड
अंबरघुमटीं घुमे मेघनाद ।
उठे पडसाद । दिशांतरीं
हृदयांत किती जड दडपण ।
उत्पात भयाण । भेवडावी
तोंच उसळती लोटावर लोट ।
धुळीचे अलोट । आभाळांत
तोंच कोसळती सरीवर सरी ।
पाणियांत सारी । सृष्टि न्हाली
मग शांत होई पार धुमाकूळ ।
मनांत व्याकुळ । तरी झालों
ऐसा विलक्षण प्रेमाचा संचार ।
निमाल्यानंतर । करी बाधा

( २ )

क्षण थरथरे धरणी कंपाने ।
परंतु तयानें । हो प्रलय
ज्वालामुखी होई जागा अवचित ।
जाळीतो समस्त । तप्त रसें
तेवीं थरथरे अवघें जीवन ।
होई धूळधाण । आकांक्षांची
तेवीं विकारांचा पेटे ज्वालामुखी ।
त्यांत ओली-सुकी । जळे प्रीत
नवीन निर्मिति होई उत्पातांत ।
गूढ भूमिगत । ये बाहेरीं
काय निर्मितील आचके कंपाचे ।
चटके लाव्हाचे । माझ्या जीवीं !

( ३ )

विश्वनिर्मितीच्या आरंभीं उडाला ।
सूर्यबिंबांतला । सात खंड
तयास मिळाली गति गरगर ।
करी भिरभीर । भू-गोल हा
त्यांत उमटली विवर्तांची लीला ।
आकर्षी चन्द्राला । भोंवऱ्यांत
विश्वजीवनाची जाहली जी गत ।
तीच हो विंबित । मम जीवीं
ध्येयसाधनेला नौका हाकारिली ।
परी गंवसली । भोंवऱ्यांत
धांवा करी मन तुझा जळदेवि !
माया ही लाघवी । आवरी गे

( ४ )

विश्वांत सामावे भुईचा विस्तार ।
परंतु अपार । तीच भासे
भुईच्या विस्तारीं आरंभीं जडत्व ।
त्यांत जीवतत्त्व । जन्मा आलें
अनंत योनींचे सचेतन जीव ।
त्यांतून मानव । विकासला
मानवी जीवनीं बहुत विशेष ।
थोरवी मनास । परी लाभे
आणि मनामाजीं भावनातरंग ।
उठती उत्तुंग । नानाविध
त्यांत सर्वांहुनी तीव्र कोठला गे ।
साक्षीनेंच सांगे । निजत्वाच्या ॥

— ना. ग. जोशी

* आगामी " अभंग छंद " या संग्रहांतून.

# चर्पटपंजरी

लेखकः— य. ग. फफे

चर्पटपंजरी म्हणजे व्यर्थ पाल्हाळ, कंटाळवाणें चऱ्हाट, हा अर्थ कसा उत्पन्न झाला असेल? वृद्ध आजोबांच्या तोंडून चर्पटपंजरिका स्तोत्रांतील 'पुनरपि जननं पुनरपि मरणं,' 'पुनरपि रजनी पुनरपि दिवसः' इत्यादि पादांतील तेच तेच शब्द आणि औदासीन्याचे तेच तेच विचार नित्य ऐकून ज्यांचे कान किटले असतील अशा संसारसुखमग्न तरुण नातवांच्या मनांत 'ही चर्पटपंजरी म्हणजे निरर्थक बडबड' असें समीकरण बसून हा अर्थ उत्पन्न झाला असेल अशी कल्पना सहज करितां येते. पण या स्तोत्रास 'चर्पटपंजरिका' हें नांव मूळ कसें पडलें असेल आणि या नांवाचा मूळचा खरा अर्थ कोणता याविषयींची कल्पना इतकी सहज करितां येण्याजोगी नाही. त्यासाठीं थोडा सविस्तर ऊहापोह म्हणजे चर्पटपंजरीच करणें भाग पडेल.

'चर्पट' म्हणजे बुडबुड्यांचा समूह असा एक अर्थ कोशांत आढळतो, पण या स्तोत्रांतील तात्त्विक बोलांस क्षणभंगुर बुडबुड्यांची उपमा कोणीं योजिली असेल हें संभवत नाहीं, म्हणून हा अर्थ येथें गैरलागू होय. चर्पट शब्दाचा दुसरा अर्थ चपेट; पसरलेल्या बोटांसह तळहात, चापट मारतांना असतो तसा. या चपेट शब्दापासून झालेला 'चपेटा' हा शब्द

सिंहाचा जो बाळ तोही चपेटा। मारी त्याला जो करी मत्त मोठा ॥

या पद्यांत गेलेला सर्वपरिचित आहेच. चर्पट म्हणजे चापट, चपराक, असा अर्थ धरून चर्पटपंजरिका म्हणजे चापटपोळ्या असा अर्थ होईल तर तो आपणांस इष्ट आहे. कारण, मग क्षणभंगुर ऐहिक सुखाच्या मोहांत निमग्न झालेल्या जीवास शुद्धीवर आणण्यासाठीं या स्तोत्रांत अनेक चापटपोळ्या दिल्या आहेत, असें म्हणतां येईल. पण चर्पट म्हणजे चापट असा अर्थ क्षणभर घेतां आला तरी पंजरिका म्हणजे पोळ्या असा अर्थ कसा होईल? पंजर-पिंजरा यावरून पंजरिका म्हणजे लहानसा पिंजरा आणि चर्पटपंजरिका म्हणजे हातांचा पिंजरा (करपंजर) कसें फार तर मानितां येईल. नलोपाख्यानांतील 'तुझा करपंजर होय मला थारा' येथील करपंजर हा शब्द आपल्या ओळखीचा आहेच. पण प्रस्तुत स्थळीं पिंजरा हा अर्थ जमूं शकत नाहीच. म्हणून ही कल्पना अग्राह्य होय. रामजयंतीसारख्या उत्सवांत सुंठवड्याचा प्रसाद वाटतात, त्यास हिंदीभाषेंत पंजरी म्हणतात. यावरून पंजरी म्हणजे प्रसाद आणि चर्पटपंजरी म्हणजे चापट्यांचा प्रसाद-चापटपोळ्या-असा अर्थ काल्पितां येईल तर तो प्रस्तुत स्तोत्रास उचितपणें जमेल. पण हिंदींत पंजरी म्हणजे सुंठवडा (प्रसाद) असा अर्थ होत असला तरी संस्कृत पंजरिका शब्दाचा तसा अर्थ होत नसल्यानें ही कल्पनाहि व्यर्थच होय. एवंच, चर्पटपंजरिका या नांवाचा ह्या स्तोत्रांतील विषयाशीं अर्थदृष्ट्या मेळ घालण्याचा प्रयत्न करणें केवळ निष्फळ होईल असेंच दिसतें.

मग चर्पटपंजरिका हें नांव अन्वर्थक नसेल तर तें श्रीमत् शंकराचार्यांनी आपल्या स्तोत्रास कसें दिलें अशी शंका कोणी घेईल. पण हें नांव स्वतः आचार्यांनी दिलेलें आहे असें म्हणण्यास काय आधार आहे? या स्तोत्राचे शेवटीं "इति श्रीमत् शंकराचार्यविरचितं चर्पटपंजरिकास्तोत्रं संपूर्णम्" असें लिहिलेलें आढळतें. पण हें वाक्य कांहीं स्वतः शंकराचार्यांनी लिहिलेलें नव्हे. तें कोणातरी लेखकानेच लिहिलेलें असणार. या वाक्यावरून हें स्तोत्र शंकराचार्यविरचित आहे एवढेंच कळतें. त्याचें चर्पटपंजरिका हें नांव स्वतः आचार्यांनीं ठेविलें असें कांही त्यावरून ठरत नाही. तसें ठरण्यास तें नांव मूळ स्तोत्रामध्येंच गोविलेलें असावयास हवें. पण त्यांत तर तें कोठेंच आलेलें नाहीं. नाहीं म्हणावयास त्यांत चर्पट एवढाच शब्द व तोही एकदाच पुढील पादांत आलेला आहे—

रथ्याचर्पटविरचितकंथः।

येथील पूर्वापरसंबंधावरून चर्पट म्हणजे चिंध्या, फाटकीं तुटकीं वस्त्रें, हाच अर्थ येथें विवक्षित आहे. पण चर्पट शब्दाचा तर तसा अर्थ नाहीं, हें आपण वर पाहिलेंच आहे. तेव्हा या पादांतील चर्पट हा अपपाठ असावा, व त्याचे जागीं चिंध्या असा अर्थ ज्यांतून निघेल असा कांहीं तरी मूळचा निराळा पाठ असावा असें अनुमान सहजच निघतें. असा शब्द कर्पट हा होय. तो स्वीकारल्यानें

रथ्याकर्पटविरचितकंथः।

अशी ओळ होते. ही ओळ छंदास ठीक जमते, चिंध्या हा इष्ट अर्थहि जमतो आणि लेखनवाचनप्रमादानें **कर्पट** याचे जागीं **चर्पट** असा अपपाठ पडणें संभवतें. पण मग असें निष्पन्न होतें कीं श्रीमत् शंकराचार्यकृत मूळ स्तोत्रांत चर्पटपंजरिकाच काय पण नुसता चर्पट एवढाहि शब्द नव्हता! अर्थात् या शब्दाचें जेव्हा स्तोत्रांत अस्तित्वच नव्हतें अशा वेळीं त्यास 'चर्पटपंजरिका' हें नांव पडणेंहि सर्वथा असंभवनीय होय. कर्पट या मूळपाठाचे जागीं कालांतरानें प्रमादानें चर्पट असा अपपाठ पडून तो रूढ झाल्यानंतरच केव्हा तरी कोणा तरी लेखकाने या स्तोत्रास 'चर्पटपंजरिका' हें नांव दिलें असलें पाहिजे असें म्हणणें भाग पडतें.

येथे कोणी अशी शंका काढील कीं, हें स्तोत्र नित्यपाठांतील असतां त्यांत कर्पट याचे जागीं चर्पट असा अपपाठ कसा उत्पन्न होईल? याचें उत्तर एवढेंच की, असे अपपाठ अनेक कारणांनी उत्पन्न होतात ही वस्तुस्थिति आहे. प्रस्तुत पादापुढलाच पाद पाहा—

रथ्याचर्पटविरचितकंथः

पुण्यापुण्यविवर्जितपंथः।

या दुसऱ्या पादांतील **पंथः** हें समासान्तीं आलेलें सानुस्वार रूप अशुद्ध आहे असें अशुद्ध रूप शंकराचार्य कसें योजितील? समासान्तीं **पथ** असें निरनुस्वारच रूप व्हावयाचें. तो स्वतंत्र शब्द असेल तर **पंथाः** असें रूप होईल. वस्तुतः येथें मूळचा पाठ

पुण्यापुण्यविवर्जितपंथाः।

असाच असणार. वरच्या पादांतील **कंथः** याशीं यमक साधण्यासाठीं **पंथः** असा अपपाठ कोणा संस्कृतानभिज्ञ लेखकाने योजिला व तोच पुढे रूढ झाला असेंच येथे म्हणावें लागतें.

याच स्तोत्राच्या ध्रुवपदांतील तिसरा पाद **प्रायः** 'प्राप्ते सन्निहिते मरणे' असा म्हणतात. पण यांत १६ मात्रा हव्या असतां चौदाच भरतात व त्यामुळें छंद बिघडतो. या स्थळीं मूळ

पाठ 'प्राप्ते सन्निहिते ते मरणे' अशा सोळा मात्रांचाच असणार. यांत ते हें एकच अक्षर क्रमाने दोनदा आलें आहे. त्यांतलें एक लेखकाच्या अनवधानानें गळून हा अपपाठ उत्पन्न झाला, हें उघड दिसतें. तेंच अक्षर क्रमाने अनेकवार आलें असतां त्यांतलें एक गळलें अशा प्रकारचा लेखनप्रमाद पुष्कळ आढळतो.

'परमे ब्रह्मणि कोपि न लग्नः' या मूळ पाठाचे जागीं एक मात्रेने उणा असलेला 'परे ब्रह्मणि कोपि न लग्नः' हा अपपाठ उत्पन्न होण्याचें कारण परब्रह्म या शब्दाचा लेखकास असलेला दृढपरिचय हेंच दिसतें.

अशा प्रकारें अनेक कारणांनीं अपपाठ उत्पन्न होत असतात व प्रस्तुत स्तोत्रांतहि ते आहेतच. कर्पट या मूळ पाठाचे जागीं चर्पट हा अपपाठ असाच वाचनलेखनप्रमादानें पडून तो रूढ झाला असावा व त्यानंतरच या स्तोत्रास 'चर्पटपंजरिका' हें नांव पडलें असावें.

येथवर आपण चर्पट या शब्दाचाच काय तो शोध घतला. पण 'चर्पटपंजरिका' या नांवांतील 'पंजरिका' या शब्दाचाहि असाच शोध घेतला पाहिजे. ज्यास चर्पटपंजरिका म्हणतात त्या स्तोत्रांत तर पंजरिका हा शब्द आलेलाच नाही. मग नामकरण करणाराने तो कोठून आणिला ? याचें उत्तर असें कीं, श्रीमत् शंकराचार्यांच्या दुसऱ्या एका स्तोत्रांत पंजरिका हा शब्द आलेला आहे. तेथूनच तो त्याने उचलला असला पाहिजे. हें स्तोत्र म्हणजे "द्वादशपंजरिका" स्तोत्र होय. या स्तोत्राचा विषय १२ पद्यांत वर्णिल्यावर त्यापुढें तेराव्या पद्यांत त्याचा उपसंहार केला आहे. या उपसंहारात्मक पद्यांत

द्वादशपंजरिकामय एषः
शिष्याणां कथितो ह्युपदेशः ।

असें या स्तोत्राचें वर्णन स्वतः आचार्यांनी केलेलें आहे. येथील पंजरिका हा शब्द स्वतः शंकराचार्यांनी योजिलेला आहे आणि या स्तोत्राचें 'द्वादशपंजरिकास्तोत्र' हें नांवहि त्यांस अभिप्रेत असावें असें म्हणतां येईल. द्वादशपंजरिकामयः या शब्दावरून पंजरिका हें एका विशिष्ट छंदाचें नांव आहे हें सहज ध्यानीं येतें. तसेंच हें स्तोत्र बाराच पद्यांचें आहे हेंहि स्पष्ट होतें. आणि म्हणून चर्पटपंजरिका स्तोत्राहून तें निराळें आहे हेंहि कळून येईल. पण या स्तोत्राचा व चर्पटपंजरिका स्तोत्राचा छंद एकच आहे. दोहोंतील विषय आणि शब्दपद्धतिहि सदृशच आहे. इतकी की, या हीं दोन स्तोत्रें मिळून एकच स्तोत्र आहे असा ग्रह कोणाचाहि व्हावा. या साम्यामुळे जणूं काय हें एकच स्तोत्र आहे असें कल्पून पाहिल्यांतला चर्पट व दुसऱ्यांतला पंजरिका हे दोन दुर्बोध शब्द एकत्र जोडून कोणातरी लेखकाने चर्पटपंजरिका हें नांव निर्माण केलें असावें. चर्पटपंजरिका या नांवाची उत्पत्ति अशीच अनुमानावी लागते. याहून सयुक्तिक असें दुसरें अनुमान पुढें येईपर्यंत तरी वरील अनुमान सुज्ञजन स्वीकारतील अशी आशा आहे.

आतां पंजरिका छंदाची ओळख करून घेणें क्रमप्राप्त होय. द्वादशपंजरिका स्तोत्राचीं उपसंहारासह तेरा पद्यें आणि चर्पटपंजरिका स्तोत्राची ध्रुवपदाच्या दोन विषमपादांसह साडेसतरा पद्यें या पंजरिका छंदांत आहेत. तसेंच कृष्णानंदसरस्वतीकृत तत्त्वमसि स्तोत्रांतील तीस पाद या पंजरिका छंदाचे आहेत. एकूण १५२ पाद होतात. त्यांच्या परीक्षणानें या पंजरिका छंदांचें लक्षण ठरतें तें असें—

१ पंजरिका छंदास चार पाद असतात;
२ प्रत्येक पादांत सोळा मात्रा असतात;
३ पादान्तीं गुरु अक्षर असतें; आणि
४ कोणतीहि सममात्रा व तत्पुढील मात्रा मिळून गुरु अक्षर होत नाही.

या शेवटल्या अटींतूनच पुढील दोन अटी निष्पन्न होतात.

( अ ) चौथी, आठवी व बारावी मात्रा परयुक्त होत नाही. म्हणून प्रत्येक पादांत चार गण म्हणजे चतुर्मात्रिक गण पडतात; तसेंच

( आ ) दुसरी, सहावी, दहावी व चौदावी या मात्रा परयुक्त होत नाहीत. म्हणून पादांत कोठेंहि जगण येत नाही.

हें पंजरिकेचें लक्षण म्हणजे पिंगलोक्त पादाकुलकाचेंच लक्षण होय. पिंगल ४–४२ प्रमाणें **गंताः द्विर्वसवः** म्हणजे ज्यांत अन्तीं गुरु अक्षर आहे अशा १६ मात्रांचा पाद असणें आणि पिंगल ४–३५ च्या अनुवृत्तीप्रमाणें **परेणयुङ् न साकम्** म्हणजे सममात्रा पुढील मात्रेशीं युक्त नसणें हेंच पिंगलोक्त पादाकुलकाचें लक्षण होय. आणि तेंच तंतोतंत शंकराचार्यांच्या पंजरिकेचें लक्षण आहे. म्हणून.

**पादाकुलक म्हणजे पंजरिका**

असें निश्चित होतें. पादाकुलकाच्या पिंगलोक्त लक्षणासंबंधाने कोणास कांही शंका असल्यास उपर्युक्त तीन स्तोत्रांतील १५२ पादांच्या परीक्षणाने त्यांचें निवारण निर्विवादपणें व्हावें असें म्हणावयास कांही प्रत्यवाय नाही. एवढें लिहिलें म्हणजे पुरे की, ज्यांत चगण पडत नाहीत असा पाद या १५२ पादामध्ये एकहि नाही. तसेंच या १५२ पादांतील ६०८ गणस्थानांत एकदाहि जगण आलेला नाही. मुक्तेश्वरी रामायणाच्या उत्तरकांडांत ६४४ ते ६५१ हीं आठ पद्यें पादाकुलक छंदांत आहेत. त्यांतहि वरील पिंगलोक्त लक्षण निरपवादपणें पाळलेलें आढळतें हेंहि येथे उल्लेखनीय वाटतें. त्या आठ पद्यांत १२८ चतुर्मात्रिक गण पडलेले आहेत व त्यांत एकदाहि जगण आलेला नाही.

**पञ्जरिका–पज्झटिका–पद्धतिका**

पंजरिका हें छंदोनाम पिंगल व भरत यानी दिलेलें नाही. शंकराचार्यांनी तें योजिलें आहे. त्यापक्षीं पिंगल व भरत यांच्यानंतर पण शंकराचार्यांपूर्वी झालेल्या कोणा छंदोग्रंथकाराने तें दिलेलें असावें. पुढील छंदोग्रंथांत पज्झटिका असें एक छंदोनाम आढळतें. तें पंजरिका शब्दाचें प्राकृत रूप किंवा वाचनदोषाने उत्पन्न झालेलें आणखीहि कित्येक छंदोनामें आढळतात. उदा.–वृत्ता–वृन्ता; भद्रक–मद्रक; नर्कुटक–नर्दटक इ. हेमचंद्राने पद्धति असें एक छंदोनाम दिलें आहे. पद्धतिका याचें प्राकृत रूप पज्झटिका असावें असें सकृद्दर्शनीं मनांत येतें. पण हेमचंद्राच्या आधी कित्येक शतकें होऊन गेलेल्या शंकराचार्यांनी पञ्जरिका हा शब्द योजिलेला आहे म्हणून पञ्जरिका–पज्झटिका–पद्धतिका असा शब्दानुक्रम म्हणजेच पद्धतिका हें पज्झटिका शब्दाचें संस्कृतीकरण मानण्याकडे प्रवृत्ति होते.

पादाकुलक ( =पंजरिका ), पज्झटिका व पद्धतिका या सर्वांतहि सोळा मात्रांचा पाद असणें ही मुख्य अट समानच आहे. पण इतर अटींत थोडा भेद आढळतो. पिंगलोक्त पादाकुलकांत जगण वर्ज्य होता. ती अट पुढें शिथिल होऊन पद्यरचना होऊं लागली तेव्हां तिचा

समावेश करण्यासाठी कांही ग्रंथकारांनी पद्धति-सारखे काहीं निराळे छंद मानिले तर इतरांनी पादाकुलक व पज्झटिका हींच नांवें कायम ठेवून त्यांच्या लक्षणांत अवश्य तो बदल केला. पण याविषयीं अधिक विवेचन करण्याचें हें स्थल नव्हे. आपणांस मुख्यत्वें श्रीमत् शंकराचार्यप्रणीत पंजरिका छंदाच्याच लक्षणांचा विचार कर्तव्य होता व तो वर झालाच आहे. सारांश,

१. चर्पट याचे जागीं मूळ पाठ कर्पट असा असावा;

२. चर्पट हा अपपाठ रूढ झाल्यानंतरच या स्तोत्रास चर्पटपंजरिका हें नांव पडलें असावें;

३. पज्झरिका याचें प्राकृत रूप पज्झटिका व त्याचें संस्कृतीकरण पद्धतिका असा शब्दानुक्रम असावा;

४. शंकराचार्यांची पंजरिका म्हणजे पिंगलोक्त पादाकुलकच होय; आणि

५. चार पाद असणें, प्रत्येक पादांत १६ मात्रा व त्यांत अन्तीं गुरु असणें, तसेंच सममात्रा कोठेहि प्रयुक्त नसणें हेंच पिंगलोक्त पादाकुलकाचें, म्हणजेच आचार्यांच्या पंजरिका छंदाचें लक्षण होय.

---

# डांगविषयक माहिती.

लेखकः— स. ना. क्षेमकल्याणी
आहवा ( डांग जिल्हा )

डांग जिल्ह्याबद्दल आजवर बरीच माहिती वाचकांना उपलब्ध झाली आहे. तींत आणखी थोडी भर घालण्याच्या हेतूने हा छोटा लेख लिहीत आहे. ब्रिटिश राजवटीत पूर्वी डांग हें एक छोटें संस्थान होतें. ती राजवट जाऊन भारत स्वतंत्र झाला व अनेक संस्थानांचें विलिनीकरण करण्यांत येऊन तीं शेजारच्या प्रांतांना वा जिल्ह्यांना जोडण्यात आलीं. डांग प्रदेश हा स्वतंत्र जिल्हा म्हणून मुंबई प्रांतांत समाविष्ट करण्यांत आला. डांग जिल्ह्याचा कारभार पूर्वीं पोलिटिकल एजंट व त्याचा दिवाण यांच्यामार्फत चालत असे. त्यामुळें या अधिकाऱ्यांच्या भाषेचीच छाप राज्यकारभाराच्या सर्व खात्यांत पडत असे. डांग जिल्हा मुंबई प्रांतांत समाविष्ट करण्यांत आल्यानंतर त्याची भाषा कोणती या संबंधीं मराठी व गुजराथी भाषाभिमानी जनतेंत एक प्रकारची तेढ निर्माण झाली. परंतु योग्य ती चौकशी--पाहणी करून मुंबई सरकारने डांगची अधिकृत भाषा मराठीच जाहीर केली व त्यामुळे वरील भाषिक तेढ पुष्कळच कमी झाली.

डांग जिल्हा साधारणतः जंगली प्रदेश आहे. खुद्द जिल्ह्यांत व जिल्ह्याला जोडून दळणवळणाचीं साधनें तुटपुंजीं आहेत. त्यामुळें खानदेश, नाशिक यांसारख्या नजीकच्या मराठी जिल्ह्यांतील व्यापाऱ्यांना डांगशीं व्यापार करणें कठीण जातें. सुरत, वापदा वगैरे गुजराथी जिल्हे लांब असूनहि तेथील व्यापारी वाहतुकीच्या सुलभ सोयींमुळें डांगमध्यें व्यापार करतात व गबर होतात. लाकडाच्या व्यापाराचें डांग जिल्ह्यांत फार महत्त्व आहे. गुजराथी व्यापारी या कामीं डांगच्या अज्ञ व प्रायः जंगली लोकांना मोलमजुरीचें आमिष दाखवून त्यांना आपलेसे करून टाकतात. डांगच्या वस्तींत भिल्ल, वारली व कोकणी या लोकांचाच भरणा अधिक आहे. हे लोक काटक, शूर व चपळ असून मोठे विश्वासू व कष्टाळू असतात. पोलिटिकल एजंटच्या अमलांत डांगी जनतेच्या कर्तृत्वाला कोणत्याहि प्रकारें वाव न देण्यांत आल्यामुळे आज ही जनता भित्री, अज्ञ व न्यूनगंडाने पछाडल्यासारखी झाली आहे.

डांगची अधिकृत भाषा मराठी जाहीर केली खरी. पण गुजराथी सरकारी अधिकारी, संस्था व कार्यकर्ते यांच्या योजनाबद्ध प्रयत्नांमुळे मराठीची अजूनहि गळचेपी होत आहे. जिल्ह्याच्या सरकारी खात्यांत अद्यापहि पन्नासपेक्षा अधिक टक्क्यांनी गुजराथी नोकरांचा भरणा आहे. यामुळे मराठी शिक्षणप्रसाराच्या कार्यांत अनेक अडचणी येत आहेत. मराठी शाळा स्थापन करण्याच्या कामीं दिरंगाई होत असते. सरकारने शिक्षणप्रचारासाठीं स्कूल बोर्डाची स्थापना केली. पण बोर्डाच्या चार सभासदांपैकीं निम्मे म्हणजे दोन सभासद गुज-

राथी नेमल्यामुळे शैक्षणिक सुधारणा गोगलगाईच्या प्रगतीने होत आहे. बोर्डाच्या दोन कळकळीच्या सभासदांच्या प्रयत्नांमुळे आज कशाबशा सुमारें चाळीस मराठी शाळा चालू झाल्या ही समाधानाची गोष्ट आहे. शाळा स्थापन करण्याच्या बाबतींत सरकारने एक विचित्र हुकूम काढला आहे. वीस किंवा वीसपेक्षा अधिक पालकांनी मागणी केल्यास त्या त्या भाषेच्या शाळा स्थापन करण्याची या हुकमाने तरतूद केली आहे. या हुकुमाचा फायदा गुजराथी सधन जनता अमूप घेत असते. अज्ञ व दरिद्री अशा डांगी लोकांना मोलमजूरी, कपडे, आश्रय इत्यादि प्रकारचीं आमिषें दाखवून त्यांच्याकडून आंगठे घेतले जातात व अशा तऱ्हेने गुजराथी शाळांची संख्या फुगविण्याचा — पर्यायाने डांगी जनतेवर गुजराथीचा छाप मारण्याचा—पद्धतशीर पण गुप्त प्रयत्न चाललेला असतो. सरकारच्या न्यायानिष्ठुर निर्णयामुळे जें आज साधतां आलें नाही तें भविष्यांत साधावयाचें असें सर्वसाधारण गुजराथी जनतेचें धोरण दिसून येतें. महाराष्ट्रीय जनतेने मराठी भाषा असलेल्या डांगबांधवांकडे योग्य वेळीं व योग्य तें लक्ष दिलें नाही तर डांग जिल्हा कांही वर्षांनी गुजराथी भाषिक होईल एवढा इषारा देऊन लेख पुरा करतों.

---

# सुश्लोक–मेघाची ' अवतरणिका '

आणि

# वाङ्मयीन सदभिरुचीचा एक अ–पूर्व प्रकार

लेखक— प्रा. रा. श्री. जोग, एम्. ए.

कोल्हापूरचे डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांनी आपल्या मेघदूताच्या अनुवादाला–सुश्लोक–मेघाला–एक प्रदीर्घ अशी अवतरणिका ( प्रस्तावना ) लिहिली आहे. मेघदूताच्या अनुवादाइतकेंच कौतुक कित्येकांनी या अवतरणिकेचेंहि केलें आहे. ' वास्तविक अवतरणिका म्हणजे लहानशी प्रस्तावना ' याची जाणीव श्रीखंडे यांस आहे. तथापि ' कितीहि लिहिलें तरी थोडेंच वाटावें असा विषय असल्याने अवतरणिका हें नांव एवढ्यासहि सार्थच होईल ' असें आपण केलेल्या विस्ताराचें समर्थनहि त्यांनी केलें आहे. अवतरणिका दीर्घ असल्याबद्दल अर्थात् तितकीशी तक्रार सहनशील वाचक करणार नाहीत; पण तीमध्ये प्रस्तुताप्रस्तुताच्या विवेकाचा एवढा अभाव प्रत्ययाला येतो की त्याकरितां तरी थोडीशी तक्रार नमूद व्हावयास पाहिजे. आणखीहि एक तक्रार अशी की या अवतरणिकेंत प्रच्छन्न वा अप्रच्छन्न अशा आत्मश्लाघेचा घमघमाट इतका भरला आहे की तो खऱ्या सहृदयांस असह्य व्हावा. आत्मश्लाघेच्या या अनावर वृत्तीमुळेच अनेक वेळां प्रस्तुताप्रस्तुताविषयक अविवेक निर्माण झाला असल्याने त्याचेंहि पर्यवसान आत्मश्लाघेंत होतें. वस्तुतः श्रीखंडे यांना त्यांचा परमादराविषय झालेल्या श्री. चिं. द्वा. देशमुख यानी अनुवाद प्रकाशनाबाबत फार चांगला आदर्श घालून दिला होता. श्री. देशमुख यांनीहि मेघदूताचा एक मराठी अनुवाद केला आहे. तो त्यांनी केवळ ' खासगी प्रसारार्थ ' छापला, त्याला कोणीहि प्रस्तावना लिहिली नाही व तो त्यांनी ' भक्तिभावाने आपले गुरुवर्य प्रो. रा. कृ. लागू यांस अर्पण ' केला आहे. ( अवतरणिका पृ. ४४ ) यांपैकीं एकहि गोष्ट डॉ. श्रीखंडे यांनी केली नाही. आपला मेघदूतानुवाद त्यांनी प्रकाशित केला, हें अर्थात् कांही अयोग्य नव्हे. पण त्याला जी एक दीर्घ प्रस्तावना जोडली आहे, व कांही परिशिष्टेंहि दिलीं आहेत, तीं दिलीं नसतीं तर देशमुखांच्या सदभिरुचीचें व विनयाचें चांगलें अनुकरण झालें असतें. आपण, आपले मित्र, आपले नातेवाईक, आपले चहाते यांचा इतका निर्देश या सर्वच ठिकाणीं झाला आहे की त्या सर्व लेखनास जाहिरातबाजीचें स्वरूप प्राप्त झालें आहे. ज्या कालिदासाबद्दल त्यांना इतकें प्रेम आणि भक्ति वाटते, त्याचें अनुकरण शृंगाररसपानामध्येच न करतांना स्वतःविषयींच्या मौनाबाबत केलें असतें तर त्याच्या वाङ्मयाचा खरोखर इष्ट असा परिणाम डॉ. श्रीखंडे यांच्यावर झाला असें म्हणतां आलें असतें.

' सुश्लोकमेघ ' हा मेघदूताचा अनुवाद आहे, मेघदूत नव्हे. तेव्हा त्यांत काय प्रस्तुत आहे याचा विचार केला असतां प्रस्तुत अवतरणिकेंतील फारच थोड्या गोष्टी शिल्लक राह-

तील. मेघदूताबद्दल एतद्देशीय व परदेशीय रसिक काय म्हणतात, त्यावर कोणी काय आक्षेप घेतले आहेत, तसेंच तें काव्य किती सुंदर आहे, इत्यादि विचार, व त्या मेघदूतावरील टीपा इत्यादि विस्तार येथे निकट-प्रस्तुत होता असें वाटत नाही. खरोखर अनुवादाविषयक आपली भूमिका विशद करण्यापलीकडे, व आवश्यकच वाटल्यास कोणी कांही साहाय्य केलें असल्यास त्याचे आभार मानण्यापलीकडे अवतरणिकेंत कांहीच करावयास नको होतें. परंतु अल्प अशा संबंधावर भर देऊन शक्य तितकें आत्मनेपदी लेखन करण्याची संधि अनुवाद-कर्त्यांनी सोडलेली नाही. अनुवाद मेघदूताचा, तेव्हा मेघदूताविषयीं कांहीहि लिहिलें तरी तें प्रस्तुत व अनुवाद आपण केला म्हणून आपल्याविषयींची माहितीहि प्रस्तुत अशी कल्पना श्रीखंडे यांनी करून घेतली. यांतून आणखीहि गोष्टी साहजिकच निघतात, त्यांचाहि अंतर्भाव करावयास हरकत नाही अशा थाटांत या अवतरणिकेचें लेखन झालें आहे. तेव्हा ती इतकी फुगावी यांत नवल तें काय ? पण ती केवळ अधिक मजकुराने फुगली आहे असें नाही, आत्मश्लाघेने तितकीच फुगलेली आहे ही गोष्ट अधिक जाणवते.

प्रस्तुतत्वाच्या चुकीच्या कल्पनेमुळे श्रीखंडे यांनी मेघदूताचें संविधानक (?) सुद्धा गद्यामध्ये ४–५ पानें भरेल इतकें अवतरणिकेंत दिलें आहे. पुढे मराठी अनुवाद हाच मुख्य भाग यावयाचा असतां त्याचा पुनः सविस्तर सारांश देण्याची काय आवश्यकता होती ? हा देऊन झाल्यावर मेघदूताचा अनुवाद सर्वस्वी यशस्वी होणें केवळ अशक्य आहे असें ते म्हणतात, पण एवढ्यावर समाधान न होतां हें मत आपण आपला अनुवाद आपल्या पुतण्यास पाहावयास पाठविला त्यावेळीं आपल्या संस्कृत पत्रांत कसें व्यक्त केलें होतें हें सांगणारें पत्रहि टीपेमध्यें त्यांनी सादर केलें आहे. चिपळूणकरांच्या मराठी मेघदूताविषयीं 'कांही विद्वान रसिक टीकाकारांच्या मतें मराठींत झालेल्या अनुवाद-वाङ्मयांत हाच श्रेष्ठतम आहे' असें मत उद्धृत करून, तें सहन न होऊन जयदेवकृत गीतगोविंदाचा आपला अनुवाद कसा सरस आहे हें सांगण्याकरितां लगेच टीपेमध्ये सुप्रसिद्ध टीकाकार वा. ना. देशपांडे यांचें एक खाजगी पत्रहि श्रीखंडे यांनी दिलें आहे. देशमुखांच्या अनुवादाविषयीं लिहितांना ते रिझर्व्ह बँकेचे गव्हर्नर झाले तेव्हा झालेल्या एका खाजगी अभिनंदनसमारंभास आपण कसे गेलों होतों व तेथे त्यांच्या अभिनंदनपर चार पद्यें रचून कशीं वाचून दाखविलीं हेंहि टीपेमध्ये दिलें आहे. त्यांत देशमुखांच्या मेघदूतानुवादाचा उल्लेख आपण केला होता एवढेंच ही टीप येथे देण्यास पुरेसें झालें. या टीपेंत आपण रचिलेलीं चार पद्यें द्यावयाचीं राहिलीं असें वाटून शेवटीं परिशिष्टांत तीं दिलीं आहेतच. त्यानंतर देशमुखांस सर पदवी मिळाली त्यावेळींहि आपण लिहिलेलें एक संस्कृत पद्यपत्र त्या परिशिष्टांत दाखल केलेलें आहे. कारण एवढेंच दिसतें की त्यांत श्रीखंडे यांनी मंदाक्रान्ता शब्द श्लिष्टार्थाने गोविला आहे. देशमुख त्यानंतर फायनान्स मेंबर झाले त्यानिमित्तानें लिहिलेलें आणखी एक पत्रहि याच न्यायाने परिशिष्टास आणखी एक परिशिष्ट जोडून द्यावयास हरकत नव्हती ! आपल्या अभिनन्दनाबद्दल आभार म्हणून देशमुखांनी लिहिलेली एक आर्याहि श्रीखंडे यांनी लगेच दिली आहे, ती पाहण्याजोगी आहे.

वाङ्मय-श्रीखण्डाच्या सुप्रासाने पुनश्च बोळाविलें। तेणें उपकृत बहु मी, कवि-बल्लव तुम्हि सलील लोळविले ॥ यांत कवींना बल्लव म्हणून व त्यांना श्रीखंडे यांनी लोळविलें असें सांगून देशमुखांना काय सुचवावयाचें आहे तें समजत नाही. बाकी श्रीखंडे यांना ती निर्भेळ स्तुति वाटत असल्यास इतरांनी कां आक्षेप घ्यावा ? देशमुखांना मात्र नको असलेली प्रसिद्धि

यामुळे मिळाली. प्रसिद्धि नको म्हणून आपला अनुवाद केवळ 'खासगी प्रसारार्थ' छापून अनेक रसिकांना त्याचा लाभ त्यांनी होऊं दिला नाही याबद्दल हें शासन योग्यच नव्हे काय ?

आत्मप्रदर्शनाची ही अनिवार इच्छा सर्वत्र भरलेली आहे. यांतूनच आपल्याला मेघदूत व रघुवंश यांतील श्लोकाचा अभ्यास करण्याची आवड केव्हा उत्पन्न झाली, आपली कालिदासाच्या आठवणीवर लिहिलेली कविता कोणती व ती कोठे प्रसिद्ध झाली ( ही कविता परिशिष्टांत दिली आहेच !) नंतर आपल्या बंधूंच्या प्रोत्साहनाने आणखीहि रचना कशी घडली, सुश्लोक-गोविंदाचा अनुवाद केव्हा केला, वाङ्मय श्रीखंड ग्रंथांत आपली व आपल्या बांधवांची रचना संगृहीत करून केव्हा छापली, त्या 'श्रीखंडा'चें कौतुक कसें झालें इत्यादि माहिती अर्थात् आली आहे. मेघदूतानुवादास प्रारंभ कसा झाला, त्यावेळीं निरनिराळ्या स्थळीं हिंडण्याची संधि कशी मिळाली, त्यांत केस्व्यास कसें जावयास मिळालें, तेथील पर्वताचें वर्णन आपल्या एका आप्तास काव्यनिबद्ध करून आपण कसें पाठविलें ( हें पत्र, त्या पत्रास आलेलें त्या आप्तांच्या चिरंजीवाचें श्लोकबद्ध उत्तर व त्यासहि श्रीखंडे यांनी तसेंच लिहिलेलें उत्तर परिशिष्टांत पाहावयास मिळतें. ) वगैरे वगैरे या अवतरणिकेंत हक्कानेच आलें आहे. कारण अनुवादाच्या प्रस्तावनेंत अनुवादकाइतका कोण प्रस्तुत असावयाचा ? यांतूनहि जें राहिलें, त्याकरितां 'दोन प्रास्ताविक शब्दां'चीं दोन पानें आरंभीं जोडलेलीं जिज्ञासूंनी पाहावीं, (व आत्मप्रदर्शन आपल्या छबीशिवाय अपुरें पडतें, म्हणूनच कीं काय, तीहि अर्पण पत्रिकेंत दिलेली आहे ती पाहावी.)

प्रस्तुताप्रस्तुतविवेकाचा श्रीखंडेकृत आणखी एक नमुना पाहण्याजोगा आहे. मराठी कवि सुमंत यांच्या मेघदूतानुवादाच्या उल्लेखामध्ये त्या अनुवादास पं. राशिवडेकरांनी लिहिलेल्या स्तुतिपर संस्कृत प्रस्तावनेंतील मेघदूत व त्याचा अनुवाद करणारा कवि यांच्या विषयींचे सात श्लोक उद्धृत केले. त्यांचा अर्थ मराठी वाचकांस समजणार नाही, म्हणून त्यांचा मराठी गद्य अनुवाद दिला. या विस्ताराचें समर्थन म्हणून सुमंतांविषयीं अकारण गैरसमज पसरविणाऱ्यांच्या हृदयास या उक्ति कदाचित् स्पर्श करतील असा विश्वास प्रकट केला. हें सर्व येथे प्रस्तुत कसें होतें तें समजणें कठिण आहे. सुमंतांच्याच भावाप्रमुखत्वाची स्तुति करतांना मेघदूतांतील श्लोकांतहि हें शब्दयोजनाप्रमुख आहे असें दाखविण्याकरिता एका श्लोकाचें विवेचन केलें, व हें केवळ सहज पुस्तक उघडलें व दिसलेला श्लोक घेऊन शलाकापरीक्षान्यायाने केलें असें म्हणून अशी शलाकापरीक्षा मोरोपंताच्या आर्याभारताची काशींतील पंडितांनी केली असतां कोणत्या सुंदर आर्या निघाल्या त्याहि दिल्या आहेत. सारांश, कोठून कोठे जावें याला कांही विशेष मर्यादा डॉ. श्रीखंडे यांनी स्वतःस घालून घेतलेली दिसत नाही.

मेघदूतावरील टीपा हा खरोखर मे० अनुवादाचा भाग होऊं शकत नाही. पण अनुवादाच्या आकलनार्थ त्यांचा उपयोग होईल म्हणून त्या चालतील असें म्हटलें तरी त्या टीपांच्या अनुषंगाने आपल्या इतर लेखनाचे घोडे पुढे ढकलणें हें अयोग्य आहे. मे० श्लोक ३४ वर "आपल्या सर्व कृतींनी परमेश्वरसेवा करावी असा भाव उत्तम प्रकारें झाला आहे' असं म्हणून लगेच [ माझ्या 'मुकुंदपूजें'त गोपी कृष्णास म्हणते ] असें सांगून आपला एक श्लोक श्रीखंडे यांनी उतरलाच. मे. श्लोक ३७ वर आभिसारिकांचें हें वर्णन अतिशय मनोरम आहे असें म्हणून पुढे आपल्या सुश्लोकगोविंदांतील उतारा दिला आहेच. परिशिष्टांत निदान

स्वतःचा स्वतंत्र श्लोक तरी होता. दुसऱ्या ठिकाणीं खरें श्रेय गीतगोविंदकाराचें. पण तेथे उतारा दिला मात्र आपल्या त्याच्या काव्याच्या अनुवादाचा. मे० ६० वर असाच कुमार संभवांतलि सदृश भागांचा उल्लेख करून उतारा मात्र आपल्या 'सुश्लोककुमार' या अनुवादाचा दिला. मे० ६५ मध्येहि तसाच प्रकार आहे. मे० ८७ मध्ये आपण अनुवादलेल्या, पण अद्यापि प्रसिद्ध व्हावयाच्या तुलसीदासांच्या रामायणांतील उतारा आला आहे. सारांश, शक्य तेथे 'बीचमें मेरा' म्हणून आपल्या लेखनाचा उल्लेख आहेच. एखाद्या बेसावध वाचकाला वाटावयाचें की कालिदासानंतर त्याच दर्जाचा कवि झाला असेल, तर हा अनुवादकर्ताच. मेघावर आधारलेल्या कांहीं कल्पना म्हणून एक परिशिष्ट देतांना श्रीखंडे यांनी योगवासिष्ठांतील दोन, रघुवंशांतील एक व नंतर लगेच आपले स्वतःचे दोन उतारे दिले आहेत, व शेवटच्या उताऱ्यांत 'विद्युल्लता शोभावि मेघपंक्ति' एवढाच काय तो कल्पनेचा भाग. जणूं काय यापेक्षा अधिक मनोरम कल्पना संस्कृत काय किंवा मराठी काय, काव्यांत आढळणें कठिण आहे !

डॉ. श्रीखंडे हे मेघदूताचा अनुवाद करणाऱ्या अनेकांपैकी एक होत. त्यांना स्वतःला इतरांचे अनुवाद नापसंत होते, तर आपणहि एक करून तो रसिकांपुढे ठेवावा हें योग्य, पण इतर अनुवादांचा उल्लेख करण्याचें टाळणें हेंच इष्ट होतें. त्यांतून तो केलाच, तर रसिकांच्या माहितीकरितां म्हणून परिशिष्टांत केवळ उल्लेख म्हणून करावयाचा. पण नाही. त्यांनी इतराच्या अनुवादांची ' शितावरून भाता 'ची करावी तशी परीक्षाहि केली आहे; व कृष्णशास्त्री चिपळूणकर, लेलेशास्त्री, देवस्थळी, अंतरकर, दामले, सबनीस यांच्या अनुवादांतील उणीवा दाखविल्या आहेत. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें तर ' इतरांनी केलेले अनुवाद अपर्याप्त वाटून स्वतःस समाधान वाटण्यासारखा अनुवाद ' करण्याकरितां श्रीखंडे हे प्रवृत्त झाले. पुनः त्यांनीच म्हटल्याप्रमाणें कोणताहि अनुवाद सर्वस्वीं बरोबर ठरणें अशक्यच होतें. मग इतरांच्या उणीवांची चर्चा न करतां आपला अनुवाद तेवढा त्यांनी रसिकांपुढे ठेवला असता तर तें सदभिरुचीला धरून झालें असतें. पण आपल्या अनुवादकौशल्याबद्दलच्या अभिनिवेशामुळे श्रीखंडे यांस हा संयम पाळणें अशक्य झालें. त्यांच्याच अनुवादाची शलाकापरीक्षा केली तर त्यांनी दुसऱ्यांमध्ये दाखविलेले दोष आढळणार नाहींत असें नाहीं. उदा. मेघदूताच्या पहिल्याच श्लोकाच्या अनुवादांत कुबेरानें यक्षास शाप दिल्याचा अनुवाद श्रीखंडे पुढीलप्रमाणें करितातः— ' कीं, कंठपत्नीविरहांत वर्षे, गेहा त्यजोनी बहु दूर रानीं. ' कालिदासाने फक्त एक वर्षाच्या कान्ताविरहाचा उल्लेख केला आहे. तो विरह रानामध्ये राहून व दूर राहून सहन केला पाहिजे असें त्याला सांगावेसें वाटलें नाहीं. डॉ. श्रीखंडे यांनी हें पदरचें घातलें नाहीं काय ? याने सुधारणा झाली काय ? की अनवश्यक गौण गोष्ट उगाच सांगितल्यासारखें झालें ? मूळ काव्यामध्ये अनुवादकर्त्यानें सुधारणासुद्धा करावी असें श्रीखंडे यांचें मत आहे. तशी आपण मूळ अर्थांत सुधारणा केली असें त्यांस म्हणावयाचें आहे काय ? त्याच श्लोकाच्या शेवटच्या ओळींतहि ' शापें परी यन्महिमा निमाला ' असें म्हणून मुळांत नसलेला ' यक्षासि त्या शांति कुठोनि लोकीं ' असा अर्थहि त्यांनी घातला आहे. अशा अनेक ठिकाणीं अनुवादकर्त्यानें सुधारणाच केली असें म्हटलें तर मूळ महाकवीपेक्षाहि अनुवादकर्ता श्रेष्ठ ठरावयाचा ! अनुवादकर्ता हाहि एक श्रेष्ठ दर्जाचा कवि असावा लागतो असें अर्थात् श्रीखंडे यांस वाटतें, व एकंदर अवतरणिकेचें लेखन पाहतां त्यांची स्वतःविषयींची कल्पना तशीच दिसते. त्याला इलाज नाहीं; पण निदान

इतर अनुवादकर्त्यांच्या वाटेस त्यांनी जावयास नको होतें. त्याच श्लोकांत पुढील ओळीची रचना पाहावी. ' वसे जरी रामागिरीवरी तो सुच्छाय ज्याच्यावरि वृक्षराजि ' या ओळींत ज्याच्यावरि या रूपास ' तो ' ची अपेक्षा साहजिकच आहे व वाचक एकदम आधीच आलेल्या ' तो ' शीं त्याचा अन्वय करूं पाहतो. पण तो म्हणजे यक्ष होय व वृक्षराजि आहे रामागिरीवर ! दुसऱ्या श्लोकातील पुढील ओळ रचनेच्या दृष्टीने लक्षांत घेण्यासारखी आहे. ' ये क्षीणता कीं इतकी, गळालीं हातांमधोनी वलयेंहि हेमीं ' या ओळींत कीं हें अव्यय इतकी याच्यापुढे यावयास हवें, आधी नको. काव्यांतहि तें वैरस्यकारक ठरतें. तसेंच ' हेमीं वलयें ' हा शब्दप्रयोगहि सुखद नाहीं. आपण उत्तरमेघाचाहि पहिलाच श्लोक घेऊन पाहूं. प्रासाद ' सचित्र ' आहेत हें कालिदासाचें म्हणणें. श्रीखंडे यांनी ' मनोज्ञ चित्रीं सजती सुरंगीं ' असें अनुवादून मनोज्ञ व सुरंगीं शब्द अधिक घातले. चित्रें रंगांचीं असल्यानें 'सुरंगीं' म्हणून वेगळा उल्लेख करण्याचें कारण नव्हतें. ' स्निग्धगंभीर ' या कालिदासकृत शब्दाचें ' गंभीर तुझे श्रुतिरम्य घोष ' असें भाषांतर केल्यानें स्निग्ध या शब्दाचा अर्थ आला नाहीं. स्निग्ध नसूनहि श्रुतिरम्य घोष असूं शकेल. स्निग्ध म्हणजे घन, भरीव असा अर्थ आहे. ' संगीताय प्रहतमुरजाः ' याचा अनुवाद ' संगीत त्यांच्यांत मृदंगयुक्त ' असा केला आहे. संगीत नुसतें मृदंगयुक्त असून काय फायदा ? त्याचें वादन व्हावयास हवें. का मृदंगाचा अर्थ लक्षणेने मृदंगवादन असा घ्यावयाचा ? तात्पर्य, शलाकापरीक्षेने आपल्याहि अनुवादांत दोष निघणें अगदी शक्य असतां इतरांच्या अनुवादांत काड्या घालण्यांत कांहीं औचित्य नव्हतें. पण आपल्या अनुवादाचें मोल दुसऱ्यांच्या अनुवादांतील उणीवा दाखविल्याखेरीज कळणार नाही असें वाटून त्यांनी हें केलें असावें. मात्र निरपेक्षतेचा आविर्भाव आणून ' अनुवाद करणें हा एक सदभ्यास आहे असें मानून सुधारणा व्हावी याच दृष्टीने न्यूनाधिक जें लिहिलें त्याबद्दल कोणाचा रोष होऊं नये ' अशी ते प्रार्थना करितात (पृ. ४४, अवतरणिका). हें त्यांचें लिहिणें मनापासूनचें असल्यास आम्ही त्यांच्या अनुवादाविषयीं वर जें लिहिलें, त्याबद्दलहि त्यांचा रोष होणार नाही अशी आशा आहे.

पण सदभिरुचि अगदी सोडल्याचीं उदाहरणें यापेक्षा वेगळींच आहेत. स्वतः कालिदासास त्याच्यावर टीका केल्याने जितका राग आला नसता, तितका तो या कालिदास—भक्तास येतो व मग तो आपल्या प्रिय कवीवर टीका करणारावर भारीच घसरतो. थोर लोकांच्या पेक्षा त्यांच्या आसपासचे लोकच त्यांना जपण्याचा आटापिटा करतांना दिसतात. त्याप्रमाणेंच हें आहे. मेघदूतामध्ये ' भौगोलिक ज्ञानावाचून दुसरें काय आहे ' असें म्हणणारा कोणी त्यांना भेटला. त्याला ' अरसिककंद ' अशी पदवी त्यांनी दिली हें ठीकच झालें. पण एवढ्यावर डॉ. श्रीखंडे यांचें समाधान झालें नाही. त्यांनी केकावलीकार मोरोपंतांच्या आधाराने 'विलोकुनि विलासिनीजन पुनःपुन्हां कामुका करी वश; नव्हे बुळा विवश घेइना कामुका' असे उद्गार काढून आपला राग शमविला. मेघदूतावर माझे स्वतःचे कांहीं आक्षेप आहेत. त्यांत मेघदूतांतील नायकाची भूमिका उपभोगातुर वाटते असा एक आक्षेप आहे. यावर श्रीखंडे यांचें उत्तर असें:— 'नवदांपत्यप्रेम हें भोगलोलुप असलें व तसें वर्णिलें, वा रम्य ध्वन्यर्थाने व सुकुमार भावनांनी या काव्यांत कालिदासप्रतिभेने तें गाइलें, तर त्याचा आनंद मानावयाचा व रसिकतेने स्वात्मानुभवाचा पडताळा त्यांत पाहून तन्मय व्हावयाचें, कीं तसें यथार्थ पण काव्यमय आदर्शवर्णन केल्याबद्दल कालिदासावर अरसिकाप्रमाणें वा अ-'ज्ञातास्वादा' प्रमाणे आघात करण्यास उठावयाचें !' एवढ्यानेहि समाधान न

होऊन ते पुढें म्हणतात, “ या अधिक्षेपकांचा स्वात्मानुभव कांही तरी निराळाच असला पाहिजे ! ” म्हणजे यक्षाची भूमिका उपभोगातुराची वाटते हा आक्षेप त्यांना मान्य आहेच; कारण ‘ काव्यात्मकता ’ भोगातच पर्यवसान पावते, कित्येक कवींच्या अविवाहित नायक-नायिकांचें शेवटीं जें व्हायचें तेंच घडतें, अशा शब्दांनी ते या सर्वांचें समर्थन करतांना दिसतात. सर्वच प्रेमिकांचें शेवटीं व्हायचें तेंच घडत असतें, परंतु तेंच दुसऱ्याजवळ उल्लेखावयाचें कीं नाही एवढाच प्रश्न असतो. यक्ष त्याचा उल्लेख करतो, कोणास तो करावासा वाटणार नाही एवढेंच !

मेघदूतामध्ये कांही ठिकाणीं तरी शृंगाराची उत्तान सूचना आली आहे असा आणखीहि एक आक्षेप मीं घेतला होता. त्याला श्रीखंडे उत्तर देतात “कालिदासाने तुम्ही ‘माझें काव्य कॉलेजांत शिकवीत चला’ असा आदेश देऊन कांही काव्यरचना केली नाही.” म्हणजे कॉलेजविद्यार्थ्यांनी तरी हा भाग वाचण्याजोगा नाही एवढें तरी श्रीखंडे यांस मान्य दिसतें व हा माल खास ‘Adults only’ असा आहे असें त्यांना वाटतें. पुढे प्रौढदंपतींचाहि उल्लेख ते करितात. “ प्रौढ दंपतींनी जें वाचतांना बिचकावें असें मेघदूतांत कांहीच नाही” असें ते सांगतात. प्रौढ दंपतींनी दोघांतच वाचण्याचा प्रश्न असता, तर डेकामेरानूहि वाचावयास हरकत नाही; परंतु सुसंस्कृत व प्रौढ अशा स्त्रीपुरुषांच्या मेळाव्यांत ज्ञातास्वादादि ओळी सहजपणें व कोणालाहि किंचित्‌हि संकोच न वाटतांना म्हणतां येत असतील तर श्रीखंडे यांचा स्वात्मानुभव कांही वेगळाच म्हणावा लागेल. खरें म्हणजे आमची परिभाषाच भिन्न पडत असावी. या उपरिनिर्दिष्ट ओळीच मी उत्तान शृंगारात्मक समजतों, व श्रीखंड्यांच्या मताने प्रौढ दंपती वाचतांना बिचकलीं; तरच तो उत्तान शृंगार असें दिसतें.

डॉ. श्रीखंडे यांची रसिकता आणि अभिरुचि कांही विशेषच आहे यांत शंका नाही. त्यामुळें पर्वत दिसला की ‘स्तन इव भुवः’ची स्मृति त्यांना होते. ‘अवतरणिके’ला प्रारंभ करतांना ‘प्रियाङ्कपालीव विमर्दहृद्या’ ( मर्दन करतांना आनंददायक अशी जणूं प्रियेची मांडीच–अनुवाद श्रीखंडे यांचा. ) हें कालिदास–कवितेचें वर्णन त्यांना सुचतें. नवीन कवींच्या रचनाशैथिल्याविषयी लिहितांना त्यांचें वर्णन ते ‘कवितेचें वृत्तवस्त्र शिथिलतेपासून मुक्तच्छंदापर्यंत प्रयोग करून स्रस्त करूं पाहणारे ‘कवियशः प्रार्थी’ अशा शब्दांनी करितात. मन्दाक्रान्ता या शब्दाचा अर्थ मंदगतीने चालणारी एवढाच न घेतां ( हळू हळू आपण आक्रान्त केलेली–कंस श्रीखंडे यांचा.) असा शृंगारसूचकहि ते देतात.

डॉ. श्रीखंडे यांची सुश्लोकमेघाची अवतरणिका ही अशी आहे. त्यांच्या सुश्लोकमेघाप्रमाणें त्याची अवतरणिकाहि त्यांच्या स्नेह्यांनी वाचली आहे व त्यांना तीहि आवडली आहे असें तें सांगतात. म्हणजे त्यांच्यामध्यें अभिरुचिसाम्य आहे असें म्हणावयास पाहिजे. वस्तुतः त्यांच्या स्नेह्यांनीच योग्य तो सल्ला त्यांना अवश्य द्यावयास पाहिजे होता. श्रीखंडे यांच्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास ते स्नेही ‘ सारज्ञ आणि असूयोज्झित ’ असले पाहिजेत. त्यांनी तें केलें असतें, तर आमच्यासारख्या ‘ सारज्ञ असूयोज्झित ’ नसणाऱ्यांना तें करावें लागलें नसतें. अवतरणिका कशीहि असली, तरी मेघदूताचा श्रीखंडे यांचा अनुवाद चांगला झाला आहे यांत शंका नाही. त्याबद्दल त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करितों. अनुवाद करण्याबाबतचे त्यांचे आमचे मतभेद मूलभूत आहेत तेव्हां त्याबद्दल येथे लिहिण्यांत अर्थ नाही. पण आपल्या विचारसरणीप्रमाणे का होईना अभ्यासपरिश्रमपूर्वक त्यांनी एवढा यशस्वी अनुवाद करावा हें खरोखरच कौतुकास्पद आहे—इति शम्.

———

हिंदींतील एका अमर महाकाव्याचा परिचय

# स्व. प्रसादकृत 'कामायनी'

लेखक—प्रा. प्र. रा. भुपटकर, एम्. ए., साहित्यरत्न

कांही दिवसांपूर्वी एक चित्रपट पहावयास गेलों होतों. युद्धामध्यें विमानांचा अतिरिक्त उपयोग केला जाऊं लागला, शत्रू विमानें पाडण्याचे निरनिराळे उपाय योजूं लागले. या प्रतिकारसाधनांच्या फेऱ्यांतून सुटण्याकरिता वैमानिक आकाशांत अधिकांत अधिक उंचावरून भ्रमण करूं लागले. अशा परिस्थितींत वातावरणांतील फरकामुळे वैमानिकांना श्वासोच्छ्वास करणें अशक्यप्राय झालें. तेव्हा वैमानिकांना सहजपणें श्वासोच्छ्वास कसा करतां येईल, त्याकरितां विमानांत आणखी काय यांत्रिक सुधारणा करतां येतील या बाबतच्या प्रयत्नांचें चित्रण हा त्या चित्रपटाचा विषय होता. मी आणि माझे मित्र चित्रपटामुळे प्रभावित झालेले होतों. कलाकृतीच्या आस्वादनाचा आनंद आम्हांस मिळालेला होता. परंतु ज्या वेळेस कलाकृतीचें विश्लेषण होऊं लागलें त्यावेळीं एका मित्रवर्यांच्या मनांत शंका उत्पन्न झाली की अशा प्रकारचा शास्त्रीय विषय ललित-कलाकृतीचा आधार बनणें कितपत उपयुक्त आहे? ही शंका याच चित्रपटाबाबत घेतली गेली असें नसून जे जे म्हणून शास्त्रीय विषयांची प्रत्यक्षाप्रत्यक्ष चर्चा करणारे चित्रपट निघाले त्यांबद्दल घेतली गेली व विषयाचा शास्त्रीयपणा हें जणूं कांही त्यांतील एक न्यून आहे अशा समजुतीने त्या गोष्टीकडे अंगुलिनिर्देश करण्यांत आला.

मला आज या सर्व गोष्टींची आठवण होण्याचें कारण म्हणजे असें की हिंदींतील आधुनिक युगाचे प्रतिनिधि स्व. जयशंकर 'प्रसाद' यांचा अंतिम काव्यग्रंथ **'कामायनी'** या महाकाव्याबद्दल देखील अशाच प्रकारचा आक्षेप घेण्यांत आलेला आहे. इतकेंच नव्हे तर कामायनी हा काव्यग्रंथच नाही, तर तो एक केवळ मानसशास्त्रीय प्रबंध आहे असें म्हणण्यापर्यंत कांही टीकाकारांची मजल गेलेली आहे. कै. कृ. प्र. खाडीलकरांच्या नाटकांवर वर्तमान पत्रांतून भल्याबुऱ्या टीकांचा वर्षाव होत असे. कै. खाडिलकरांनी कधीहि या टीकांना उत्तर दिलें नाही. ते म्हणत "माझ्या नाटकांचें मूल्य शेवटीं काळ ठरविणार आहे. मी कशाला टीकांना उत्तरें देण्याच्या भानगडींत पडूं?" आज त्यांच्या नाटकांचा गौरव होत आहे, व टीका विस्मृतीच्या गर्भांत विलीन झालेल्या आहेत. नेमकें हेंच प्रसादांच्या कामायनीच्या बाबतींत झालें. मानसशास्त्रीय प्रबंध म्हणून हेटाळणी करणाऱ्यांचा स्वर हवेंत विरून गेला आणि आधुनिक हिंदींतील 'रामचरित मानस' म्हणून कामायनीचा गौरव करणाऱ्यांचा स्वर अजूनहि आकाशांत दुमदुमत आहे.

कामायनीचा विषय, तसेंच कायायनीद्वारा कवीने जगाला दिलेला संदेश समजावून घेण्याच्या दृष्टीने प्रथम कामायनीच्या कथासूत्राची ओळख करून घेणें अधिक इष्ट होईल.

कामायनीच्या कथासूत्राचीं बीजें आपणांस वैदिक साहित्यांत पाहावयास मिळतात. आपल्या काव्याच्या कथानकांतील प्रधान पात्रें मनु, श्रद्धा ( कामायनी ) आणि इडा यांच्या संबंधीं वैदिक साहित्यांत मिळणारी ठिकठिकाणीं विखुरलेली माहिती संकलित करून प्रसादांनी आपल्या कथानकाची मांडणी केलेली आहे. वैदिक साहित्यांतील आधारस्वरूप कथा पुढील प्रमाणें आहे.

जलप्लावन या भारतीय इतिहासप्रसिद्ध घटनेनंतर, देवांपासून सर्वथा निराळी अशी मानवीय संस्कृति स्थापन करण्याची संधि मनूला मिळाली. मनु आणि श्रद्धा यांचें मीलन एका नवीन युगाच्या प्रारंभास कारणीभूत होऊन मन्वंतराचा प्रवर्तक होण्याचा मान मनूस मिळाला. निर्जन प्रदेशामध्ये सृष्टीच्या पुनर्रचनेचें कार्य सुरू झालें. आणि पुरोहिताच्या प्रेरणेनें मनूने यज्ञ केला व त्यांत पशुबलि दिला.

या यज्ञानंतर मनूच्या मनांतील देवप्रवृत्ति पुनः उचंबळून वर आली. याच वेळीं मनु आणि इडा यांची गांठ पडली व श्रद्धेबद्दलच्या मनूच्या भावनांमध्ये परिवर्तन घडून आलें. इडेकडे आकृष्ट झाल्यामुळे मनु श्रद्धेबाबत उदासीन झाला. इडेच्या प्रेरणेने बुद्धीचा विकास, राज्यस्थापना इत्यादि कार्यांमध्ये मनूस सफलता मिळाली. या सफलतेने उत्तेजित होऊन इडेचा स्वामी बनण्याची महत्त्वाकांक्षा मनूच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. परमेश्वरी कोप झाला. अपराधाचा दण्ड मनूस भोगावा लागला. इडा ही देवांची बहीण, मानवास चैतन्यप्रदान करणारी, तेव्हा श्रद्धा आणि मनु यांमध्यें ती बाधास्वरूप ठरावी आणि बुद्धिवादाच्या विकासाच्या भरंवशावर अधिक सुख प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नांत पदरीं दुःख यावें यांत अस्वाभाविक असें कांहीच नाही.

या आधारभूत ऐतिहासिक कथेच्या आधारावर कामायनीचा भव्य प्रासाद प्रसादांनी उभारलेला आहे. काव्याच्या कथानकाचा प्रारंभ आदिपुरुष मनु याच्या मनांत निर्माण झालेल्या 'चिन्ते' पासून केलेला आहे. पहिल्या सर्गांत मनु एका शिळाखंडावर बसून भूतकालीन गोष्टींचा विचार करण्यांत लीन झालेळा असून भविष्यकाळाबाबत संपूर्णपणें अज्ञान असल्यामुळे एक प्रकारची चिन्ता त्याच्या मनामध्ये उत्पन्न झाल्याचें आपणांस समजतें. कांही दिवसांनी मनूची श्रद्धेबरोबर ओळख होते. ओळखीचें पर्यवसान प्रणयांत होतें. परंतु दुर्दैवाने या प्रणयाचा अंत लवकरच होतो. पूर्वसंस्कारांच्या दडपणामुळे मनु हा कर्मासक्त असतो. यज्ञाकरितां तो शिकारीला जातो. याच वेळीं श्रद्धेचा आपल्या पुत्राबरोबर चाललेला प्रेमवार्तालाप ऐकून त्याच्या स्वार्थास धक्का पोचतो. त्याच्या मनामध्ये श्रद्धेचा प्रेमपात्र एकमेव मीच असावें ही भावना उग्ररूप धारण करते. श्रद्धेच्या प्रवृत्ति भिन्न स्वरूपाच्या असल्यामुळे मनु श्रद्धेचा त्याग करून निघून जातो.

श्रद्धेपासून जरी शरीराने दूर झाला तरी मनांतून श्रद्धेला काढून टाकणें मनूस अशक्यप्राय होतें. परंतु याच वेळीं मनूस इडेचें प्रथमदर्शन घडलें आणि इडा अल्पावधींतच मनूची हृदयस्वामिनी बनली. नुकत्याच स्वतः प्रस्थापित केलेल्या नगरांची शासनव्यवस्था हा मनूचा प्रिय उद्योग झाला. नियम बनवून त्यांच्या प्रचाराच्या द्वारा जनतेमध्ये वर्गभेद निर्माण करून आपलें राज्यंत्र चालू ठेवण्यांत मनु मग्न झाला. अहंकाराची त्याला बाधा झाली व स्वतःस नियमातीत समजण्याची चूक त्याने केली. इडेने नियम शासक आणि शासित या दोघांनीहि निष्ठापूर्वक पालन करावयाचे असतात असें मनूस सुचाविले. परंतु अहंकाराने अंध

अनुक्रमणिका

झालेल्या मनूचे कान हिताचा सल्ला ऐकण्याच्या बाबतींत बहिरे झालेले होते. इडेला बंदी करून पराधीन बनविण्यापर्यंत मनूची मजल गेली. परिणामस्वरूप प्रजेने बंड केलें. मनूने प्रजेला युद्धास आव्हान दिलें आणि प्रजेशीं झालेल्या युद्धांत मूर्च्छा येऊन तो खालीं पडला.

श्रद्धेला स्वप्नद्वारा या सर्व गोष्टींचा पत्ता लागला. आपल्या पुत्राला बरोबर घेऊन ती मनूच्या शोधार्थ निघाली. मनूचा शोध लागला. परंतु पश्चात्तापदग्ध मनूला श्रद्धेला तोंड दाखविण्याची लाज वाटून तो रात्रीच्या वेळीं तेथून निघून गेला. श्रद्धा आणि इडा एकमेकींना भेटल्या. बोलणीं झालीं; आणि आपल्या मुलाची जबाबदारी इडेवर टाकून श्रद्धा पुनः मनूच्या शोधार्थ बाहेर पडली. सरस्वतीच्या किनारीं एका गुहेमध्ये तिची मनूशीं भेट झाली. एका काळचा कर्मासक्त मनु आज योगसाधनेमध्ये रत होण्यास अधीर झालेला तिला आढळून आला. " श्रद्धे, मला त्या परमशक्तीच्या चरणापाशीं घेऊन चल " ही मनूची विनंती मान्य करून श्रद्धा मनूला आपल्याबरोबर घेऊन हिमालय चढू लागते. शेवटीं इतक्या उंचीवर ते पोचतात की भूमीचें कांहींहि चिन्ह दिसत नाही. याच ठिकाणीं कवीने श्रद्धेच्या मुखाने ज्ञान, इच्छा आणि क्रिया यांचें रहस्य मनूला समजावून दिलेलें आहे. श्रद्धा म्हणते, ' जों पर्यंत या तिहींचा समन्वय होत नाही तोंपर्यंत जीवन म्हणजे एक विटंबनाच होय. ' असें म्हणून श्रद्धा हसते आणि त्या हास्याबरोबरच इच्छा, ज्ञान, व क्रिया यांचा समन्वय होऊन ' अनहद ' ध्वनि ऐकूं येऊ लागतो, व त्याच ध्वनीमध्ये मनु विलीन होऊन जातो.

हें आख्यान इतकें प्राचीन आहे की स्वाभाविकपणेच त्यामध्ये इतिहास आणि रूपक यांचें अद्भुत मिश्रण झालेलें आहे. त्यांतील रूपकात्मकता कवीला निषेधार्ह वाटत नसून उलट अभीष्टच वाटते आणि म्हणूनच कोणी या कथेचा सांकेतिक अर्थ लावण्याची अभिलाषा बाळगल्यास कवीची त्याला हरकत नाही. म्हणूनच अत्यंत संक्षिप्त स्वरूपांत या कथेची सांकेतिक पार्श्वभूमि स्पष्ट करण्याचा प्रयत्न करणार आहें.

वरील कथेंतील तीन पात्रांची कहाणी ही तीन मनांची कहाणी आहे. किंबहुना एकाच मनाच्या तीन पैलूंची ही कहाणी आहे असें म्हटलें तर तें अधिक सार्थ होईल. मनु, श्रद्धा आणि इडा हीं मन श्रद्धा आणि बुद्धि यांचीं प्रतीकें आहेत. मन तन्हेतन्हेच्या चिन्तांचें निवासस्थान आहे. चिन्तेचा जन्म अभावाच्या पोटीं होतो. अभावामुळे असमाधान वाटतें. हें असमाधान दूर करण्याचा एक मार्ग आशेच्या रूपाने मनापुढे उभा राहतो. तो मार्ग म्हणजे श्रद्धायुक्त आंतरिक चिंतन. मन बाह्य संघर्षापासून विमुख होऊन श्रद्धापूर्वक अंतरंग-रहस्य उलगडूं लागलें की सुखाचा अनुभव येऊं लागतो. इतकें अन्तर्मुख झाल्यावर मनामध्ये अचानक अधिकारभावना निर्माण होते. आन्तरिक चिंतनामध्ये लीन होतां होतां आपण व्यक्तित्वशून्य होत चाललों आहोंत ही जाणीव मनाला असह्य होते आणि मन माघार घेऊं लागून पुनः आपल्या मूळ पदावर येतें.

दुसऱ्या रस्याने जाऊं लागलेलें मन बुद्धीच्या जाळ्यांत सांपडतें. नवीन नवीन कल्पना बुद्धीच्या साहाय्याने साकार होत असल्याचें प्रत्यंतर मनास मिळतें. बुद्धीची कर्तृत्वशक्ति अगाध, अथांग असल्याची खात्री पटते. बुद्धीचा जितका उपयोग करावा तितकी अतृप्ति वाढतच जाते. बुद्धि कधीच कुणाची गुलाम झालेली नाही. यामुळे अधिकारभावनेच्या पूर्ततेची मानवमनाची आकांक्षा अपुरीच राहिली, बुद्धीशीं वैर उभें राहिलें आणि पुनः खिन्नता उत्पन्न झाली.

अशा वेळीं श्रद्धाच पुनः साहाय्याला धावून येते, श्रद्धेच्या साहाय्याने मन पारलौकिक सुखाचा अनुभव घेतें. मनाला अेक अलौकिक शक्तीचा प्रत्यय मिळतो. आणि ज्ञान इच्छा आणि क्रिया यांना ओलांडून मन शुद्ध आनंदामध्ये रममाण होतें.

या सांकेतिक अर्थाचा थोडासा लक्षपूर्वक विचार केल्यास कवीला या काव्याच्या द्वारें जगाला जो संदेश द्यावयाचा आहे त्याचें आकलन स्पष्टपणें होईल. तो संदेश थोडक्यांत असा. बुद्धितत्त्व आणि भावनातत्त्व यांच्या उचित समन्वयांतच मानवतेची सफलता विहित आहे; भावनेने बुद्धीवर नियंत्रण घालण्यात अथवा बुद्धीने भावनेवर वर्चस्व गाजविण्यांत नाही काव्यांतील मनुप्रमाणेच आजचे बुद्धिवादी शास्त्रीय जग बुद्धीच्या बळावर, भावनेच्या शक्तीची उपेक्षा करून, मनुष्याला पादाक्रांत करूं इच्छीत आहे. फळ मिळालें तें अशांति आणि युद्धाच्या स्वरूपांत. भावनेच्या शक्तीकडे लोकांचें लक्ष वेधणें याचा अर्थ असा नव्हे की, प्रसादांना बुद्धिबहिष्कार अभिप्रेत आहे. मुळीच नाही. प्रसादांचा विरोध बुद्धीशीं नसून अतिरेकी बुद्धिवाद्यांशीं आहे. उलट त्यांचें म्हणणें असें आहे की जसा अतिरेकी, निरंकुश बुद्धिवाद शाश्वत कल्याणाची प्रतिष्ठापना करण्यास असमर्थ आहे तसाच केवळ हृदयप्रेरित कोमल संवेदना आणि श्रद्धाप्रेरित भावनाहि पण प्रगतिशील विश्वचक्राचें संचालन व नियमन करण्यास दुबळ्या ठरणार आहेत. त्यांच्या मतें ज्या वेळेस कल्पना, दर्शन आणि कर्म एकस्वरूप होतील त्याच वेळीं परिपूर्ण मानवतेचें दर्शन होईल.

पाहूं या जग प्रसादांच्या संदेशाकडे किती लक्ष देतें तें !

———

## 'पार्लमेंटरी डेमॉक्रसी' विषयीं बर्नार्ड शॉ—

I am going to ask you to begin our study of 'Democracy' by considering it first as a big balloon, filled with gas or hot air, and sent up so that you shall be kept looking up at the sky whilst other people are picking your pockets. When the balloon comes down to earth every five years or so you are invited to get into the basket if you can throw out one of the people who are sitting tightly in it; but as you can afford neither the time nor the money and there are forty millions of you and hardly room for six hundred in the basket, the balloon goes up again with much the same lot in it and leaves you where you were before.

———

# परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

**प्राज्ञ-विशारद वर्गः—** प्राज्ञ-विशारद वर्गांत डॉ. बा. मो. कानिटकर व प्रा. गं. भा. निरंतर यांनीहि अध्यापनाचें कार्य केलें. दोन्ही वर्ग नोव्हेंबरअखेर बंद झाले. प्राज्ञ वर्गाची सहल निघाली होती. विशारद वर्गाचें स्नेहसंमेलन झालें. यंदा विशारद वर्गाने परिषदेस एक घड्याळ ( मूल्य रु. ६४ ) भेट म्हणून दिलें.

**कै. न. चिं. केळकर स्मृतिदिन :—** रविवार दि. १५–१०–५० ला सायंकाळीं ६॥ वाजतां कै. न. चिं. केळकर स्मृतिदिनानिमित्त 'लोकसत्ता' कार श्री. ह. रा. महाजनी यांचें 'साहित्यांतील सविकल्प समाधीचा सिद्धांत' या विषयावर व्याख्यान झालें.

**कै. माधव जूलियन स्मृतिदिनः—** बुधवार दि. २९।११।५० ला सायंकाळीं ६ वाजतां कै. माधवराव पटवर्धन स्मृतिदिनानिमित्त डॉ. माईणकर ( विलिंग्डन कॉलेज, सांगली ) यांचें 'माधवराव पटवर्धन व उमरखय्याम' या विषयावर व्याख्यान झालें. याचप्रसंगीं सुरवातीस राजकवि यशवन्त यांचें इरतें 'संधि' या प्रातिनिधिक कवितासंग्रहाचें प्रकाशन झालें.

**बर्नार्ड शॉ-दुखवटा सभा :—** जगत्प्रसिद्ध नाटककार जॉर्ज बर्नार्ड शॉ यांच्या निधनानिमित्त रविवार दि. २६।११।५० ला सायंकाळीं प्रा. म. गो. भाटे यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होऊन प्रा. श्री. के. क्षीरसागर व प्रा. सत्तिगिरी यांचीं भाषणें झालीं. सोमवार दि. ११–१२–५० ला सायंकाळीं प्रा. रा. शं. वाळिंबे यांचें प्रा. सत्तिगिरी यांच्या अध्यक्षतेखालीं 'नाटककार शॉ' या विषयावर पुन्हा व्याख्यान झालें.

**मेजर गद्रे यांचें व्याख्यान :—** रविवार दि. २९।१०।५० ला सायंकाळीं ६ वाजतां मेजर ना. बा. गद्रे यांचें 'तंजावर येथील प्राचीन मराठी व इतर ग्रंथ' या विषयावर व्याख्यान झालें.

**प्रचार व दौरे :—** मुंबई येथील संमेलनांत संमत झालेल्या महत्त्वाच्या ठरावांची अंमलबजावणी होण्यासाठी परिषदेचे अध्यक्ष राजकवि यशवन्त व चिटणीस प्रा. वा. दा. गोखले यांनी या तिमाहींत अनेक दौरे काढले. त्यांतील दक्षिण महाराष्ट्रांतील दौरा हा संयुक्त महाराष्ट्र व शिरगणती या दृष्टीने महत्त्वाचा होता. बेळगांव, कारवार, निपाणी, संकेश्वर या प्रमुख शहरीं जाऊन त्यांनी व्याख्यानें दिलीं. कार्यकर्त्यांच्या बैठका झाल्या. स्थानिक पुढाऱ्यांशीं विचारविनिमय केला. लोकांत बरीच जागृतीहि निर्माण झाली आहे. कारवार येथे मे महिन्यांत साहित्य-संमेलन व्हावयाचें आहे. या दृष्टीने तेथील स्थानिक लोकांशीं विचार-विनिमय करून अधिवेशनाच्या कार्यास मार्गदर्शन केलें. बेळगांव, कारवार येथे राजकवि यशवन्त यांचा सत्कार करण्यांत आला. कारवार येथे प्रा. गोखले यांचें व्याख्यान झालें व त्यांनी कोंकणी, मराठी या भाषांचा संबंध स्पष्ट केला. या दौऱ्यांत बेळगांवचे श्री. सुंठणकर, श्री. माजरेकर, प्रा. य. द. भावे, श्री. साठे, कारवार येथील डॉ. बाव, डॉ. मुजुमदार, सौ. मुजुमदार, श्री. फातरपेकर, श्री. कुलकर्णी वकील; संकेश्वर निपाणी येथील श्री. जोशी, मुख्याध्यापक श्री. धों. श्री. नाईक, श्री. ह. श्री. पुजारी इत्यादि व्यक्तींचें फारच साहाय्य झालें.

चिपळूण येथील नवरात्र व्याख्यानमालेसाठी श्री. केतकर यांच्या निमंत्रणावरून प्रा. वा. दा. गोखले व राजकवि यशवन्त हे मुद्दाम गेले होते त्या ठिकाणींहि परिषदेच्या कार्याला बरेंच प्रोत्साहन मिळालें. या वर्षी अध्यक्ष राजकवि यशवन्त यांना अनेक संस्थांकडून महाराष्ट्रभर निमंत्रणें आलीं व येत आहेत. त्यानुसार जळगांव येथील व. वा. वाचनालयाच्या व्याख्यान-मालेसाठी ते जळगांव मुक्कामीं गेले व त कार्य आटोपल्यावर नंदुरबार, अंमळनेर वगैरे ठिकाणीं जाऊन त्यांनी बराच प्रचार केला. अहमदाबाद येथील गुजराथ कॉलेजच्या मराठी वाङ्मय मंडळाच्या स्नेहसंमेलनासाठी अहमदाबाद येथे गेले असतां त्यांनी अनेक गुर्जर साहित्यिकांची भेट घेतली व भाषाविषयक विचारविनिमय केला.

परिषदेच्या कार्याचा प्रचार या वर्षी सोलापूर शाखासभेने फारच मोठ्या प्रमाणांत केला. गतवर्षी सोलापूर येथे जिल्हा संमेलन झालें. पुढे कुर्डूवाडी येथे विभाग संमेलन पार पडलें. या तिमाहींत मंगळवेढें गांवीं विभाग संमेलन भरलें. संमेलनाचें उद्घाटन राजकवि यशवंत यांनी केल्यावर अध्यक्षस्थानीं परिषदेचे चिटणीस प्रा. अ. गं. मंगरूळकर यांची योजना झाली. या संमेलनासाठीं सोलापूरहून शाखा सभेचे श्री. जक्कल, कवि कुंजविहारी श्री. शंकरराव पटवर्धन, श्री. कवडी (पितापुत्र), श्री. कुलकर्णा, श्री. जामदार, श्री. कामतकर इत्यादि कार्यकर्ते उपस्थित होते. स्थानिक पुढाऱ्यांपैकी श्री. लडके वकील (स्वागताध्यक्ष), श्री. करंदीकर वकील वगैरेंना संमेलनाच्या यशाचें श्रेय देणें युक्त आहे.

**सोलापूर जिल्हा साहित्य संमेलनः**—बार्शी गांवीं ता. २३, २४, २५ रोजीं मोठ्या उत्साहाने भरलें. त्याबरोबरच वृत्तवाङ्मय संमेलन, कविसंमेलन व महिलासंमेलन हे कार्यक्रम यशस्वी रीत्या पार पडले. मुंबईहून आचार्य अत्रे, श्री. श्री. शं. नवरे, पुण्याहून राजकवि यशवंत, प्रा. वा. दा. गोखले, कवि मनमोहन, सोलापूरहून श्री. बाबूराव जक्कल, कवि कुंजविहारी श्री. शंकरराव पटवर्धन, श्री. मुद्गल, श्री. कामतकर, श्री. शारंग कुळकर्णी, श्री. नरेश कवडी, श्री. कवडी वकील, प्रा. वि. म. कुळकर्णी, श्री. सुमतिबाई शहा, श्री. प्रभावती केसकर, कवि पद्माकर इत्यादि कार्यकर्ते उपस्थित होते. व्याख्यानें, चर्चा इत्यादि बौद्धिक कार्यक्रमांबरोबर, काव्यगायन, नाटकें वगैरे मनोरंजक कार्यक्रम झाल्यामुळे संमेलनाचे तीन दिवस बार्शीकरांना मोठ्या आनंदाचे व धावपळीचे गेले. हें संमेलन यशस्वी करण्यासाठी बार्शीचे श्री. बापूसाहेब सुराखे, श्री. उद्धवराव माळी व त्यांचे इतर सहकारी यांनी अतोनात श्रम केले. परिषद या सर्वांची ऋणी आहे.

**परीक्षाः**—परिषदेच्या परीक्षा ता. १७, १८, १९, २० रोजीं झाल्या. या वर्षी सुमारें १०० केंद्रें होतीं. एकंदर उमेदवारांची संख्या सुमारें ३१०० भरेल.

**संमेलनाध्यक्षीय निवडणूक**—कारवार येथे भरणाऱ्या म. सा. संमेलनाच्या अध्यक्ष-पदासाठी रा. र. दि. ब. वा. वि. जोशी, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. अ. का. प्रियोळकर आणि श्री. शं. के. कानेटकर (कवि गिरीश) अशीं चार नांवें आलीं. परंतु कवि गिरीश यांनी आपलें नांव मागे घेतल्यामुळे तीनच नांवें राहिलीं. घटनेप्रमाणे तीन नांवें पाठवाव-याचीं असतात. सबब परिषदेच्या सभासदांकडून आतां निवडणूक व्हावयाची नाही. राहि-लेलीं तीन नांवें स्वागत मंडळाकडे पाठविण्यांत येतील व स्वागत मंडळ त्यांतील एक अध्यक्षपदासाठी निवडील.

———

# नवीन सभासद

## तहहयात

१ प्रा. ग. प्र. प्रधान, ५८३ सदाशिव पुणें २
२ डॉ. रा. ग. हर्षे, डेक्कन कॉलेज, पुणें ६
३ श्री. शं. वा. किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी.
४ श्री. केशव गणेश आपटे, साखरवाडी. ( उत्तर सातारा )
५ प्रा. अ. गं. मंगरूळकर, टिळकवाडी, सदाशिव, पुणें २

## साधारण

१ प्रा. वि. रा. करंदीकर, सहस्रबुद्धे बंगला, एक्सटेन्शन्, सांगली.
२ सौ. इंदिराबाई पेंडसे, C/o डॉ. पेंडसे, खणभाग, सांगली.
३ सौ. उर्मिलाबाई लक्ष्मण भागवत, C/o डॉ. भागवत, कल्याण.
४ श्री. सी. स. दीक्षित, मुख्याध्यापक, राजाराम विद्यालय, कोल्हापूर.
५ श्री. शं. वि. सालये, ३० श्रीसदन, देवकरण नानजीवाडी, मुंबई २
६ श्री. दि. गं. तमरस, रेल्वे क्वार्टर्स नं. जी ९१, कल्याण.
७ श्री. शं. शि. चुके, मुधोळकर पेठ, अमरावती.
८ श्री. य. शं. पंडित, सटाणें ( जि. नाशिक )
९ श्री. शांतादेवी चौधरी, मु. पो.-खिरोदें ( पू. खा. )
१० श्री. रा. वि. कामत, व्ही. के. हाय-स्कूल, पनवेल ( कुलाबा )
११ श्री. श्री. रा. केतकर, चिपळूण, ( रत्नागिरी )
१२ श्री. वि. अ. जवखेडकर, भवाळकर वाडा, पानदरीबा, उज्जयिनी.
१३ श्री. दा. बा. मोने, आइस फॅक्टरी, अंकोला ( उत्तर कॅनरा )
१४ श्री. ना. गो. कालेलकर, प्रतापबाग, बडोदें.
१५ श्री. रा. म. केळकर, मांद्रे, पो- सिवोली ( गोवा )
१६ सौ. नलिनीबाई शिंदे, गणपतभुवन, शनिवार, पुणें २
१७ श्री. ना. म. चिटणीस, कुर्डूवाडी ( सोलापूर )
१८ श्री. श्री. ना. तांबे, C/o सुरेश वॉच मेकर, कुर्डूवाडी ( सोलापूर )
१९ श्री. ग. ह. देशपांडे, कुर्डूवाडी ( सोलापूर )
२० श्री. भा. ना. बीडकर, गांधीचौक, कुर्डूवाडी ( सोलापूर )
२१ सौ. दयाबाई देवधर, द.- सातारा जिल्हा हॉटेल, सांगली.
२२ श्री. र. श्री. कार्यकर्ते, मु. पो.-कुर्डू-वाडी, ( सोलापूर )
२३ श्री. बा. द. सातोस्कर, १४ त्रिभुवन रोड, मुंबई ४
२४ डॉ. व्यं. मं. कैकिणी, चर्नी रोड, मुंबई ४
२५ श्री. शं. स. वागळे, नॅशनल ऑटोमो-बाईल कं. लि. मुंबई ४.
२६ श्री. गो. स. वाघ, १४८ अमृतवाडी, विठ्ठलभाई पटेल रस्ता, मुंबई ४.
२७ श्री. दत्तु बांदेकर, कृष्णनिवास, ९ खेतवाडी, मुंबई ४.
२८ श्री. अ. का. प्रियोळकर, सरस्वति-बिल्डिंग, मुंबई ४.
२९ श्री. आ. रा. नाडकर्णी, १७७।७९ लॅमिंग्टन क्रॉस रोड, मुंबई ७.

३० श्री. ह. रा. महाजनी, ससून डाक, कुलाबा, मुंबई ५.
३१ श्री. भा. रा. वाळके, साखरवाडी (उत्तर सातारा)
३२ श्री. बिं. ना. सवदी, शिक्षक, साखरवाडी (उत्तर सातारा)
३३ श्री. पु. न. सप्रे, शिक्षक, साखरवाडी (उत्तर सातारा)
३४ श्री. अ. वि. काळे, प्रमुख, साखरवाडी विद्यालय, साखरवाडी (उ. सातारा)
३५ श्री. वि. शं. पुरंदरे, ८३ सदाशिव, पुणें २.
३६ श्री. दें. कृ. बढे, ट्रे. कॉलेज फॉर विमेन, जळगांव (पू. खा.)
३७ प्रा. ग. ह. तारळेकर, एम्. जे. कॉलेज, जळगांव (पू. खा.)
३८ प्रा. नलिनी जोशी, एम्. जे. कॉलेज, जळगांव (पू. खा.)
३९ प्रा. म. मो. केळकर, २७९ बळिराम पेठ, जळगांव (पू. खा.)
४० श्री. ग. ना. कामत, वकील, कारवार.
४१ डॉ. वा. त्र्यं. वाघ, कारवार.
४२ श्री. कृ. श्री. देसाई, हिंदु विद्यालय, कारवार.
४३ सौ. उपादेवी आनंदराव मुझुमदार, कारवार.
४४ श्री. आ. द. कुलकर्णी, काजूबाग, कारवार.
४५ श्री. र. श्री. पुजारी, संकेश्वर (बेळगांव)
४६ श्री. र. शं. कुलकर्णी, संकेश्वर (बेळगांव)
४७ श्री. वासू देशपांडे, शिक्षक, संकेश्वर (बेळगांव)
४८ श्री. धों. श्री. नाईक, संकेश्वर (बेळगांव)
४९ डॉ. शं. गो. तुळपुळे, पुणें विद्यापीठ, पुणें ७
५० श्री. मा. गो. काटकर, मुख्या. विद्याविकास हायस्कूल, सोलापूर.
५१ श्री. ग. गो. कुलकर्णी, ३९३ कसबा, बार्शी (सोलापूर)
५२ श्री. गं. ग. गुर्जर, कसबा, बार्शी (सोलापूर)
५३ श्री. इ. आ. रोहेकर, जॉइंट सिव्हिल जज्ज, बार्शी (सोलापूर)
५४ श्री. शं. म. धायगुडे, २१३४ आडवा रस्ता, बार्शी (सोलापूर)
५५ श्री. उ. ज. माळी, किराणा रस्ता, बार्शी (सोलापूर)
५६ श्री. द. वि. अगरवाल, ७९३।१४ भवानी पेठ, पुणें २
५७ श्री. रा. स. परांजपे, वकील, ४८ शुक्रवार; पुणें २
५८ श्री. इ. अ. रोहेकर, २८८ म. गांधी रस्ता, पुणें १
५९ श्री. बा. प्र. नगोजी, २८८ म. गांधी रस्ता, पुणें १

---

## साभार स्वीकार—

१ आश्रमांतील स्त्रियांस (बापूंची पत्रें)—संपा. काका कालेलकर, नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद, मूल्य १। रु.

२ मराठीचें अध्ययन—प्रका. डॉ. बा. मो. कानिटकर, १२९५ शि. नगर, पुणें ४.

३ आजकालचें गद्य—संपा. प्रा. वा. दा. गोखले व प्रा. म. वि. फाटक; मॉडर्न बुकडेपो, पुणें २; मूल्य ३ रु.

४ मराठी भाषा उद्गम व विकास (द्वितीयावृत्ति)—ले. प्रा. कृ. पां. कुलकर्णी; मॉडर्न बुक डेपो, पुणें २; मूल्य ८ रु.

५ आणि माणसाचा मुडदा पडला (कादं.)—अनु. श्रीपाद जोशी; प्रका. पां. रा. ढमढेरे, सदाशिव, पुणें २; मूल्य ४ रु.

६ जीवनसरिता (कविता)—कवि द. गं. पाळंदे; प्रका. महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; मूल्य २॥ रु.

७ प्रौढांचें शिक्षण व साक्षरता प्रसार—ले. आनंदराव मानकर; प्रका. लेखनवाचन भांडार, लक्ष्मीपथ, पुणें २; मूल्य १॥ रु.

८ मानवतेचे पुजारी (भाग १ ते ३)—ले. ना. ध. पाटील; प्रका. लेखन वाचन भांडार, लक्ष्मीपथ, पुणें २; मूल्य १॥ ते २ रु.

९ आजकालचे विद्यार्थी—ले. प्रा. श्री. म. माटे; प्रका. लेखनवाचन भांडार, पुणें २; मूल्य २॥ रु.

१० श्री महागणपती—ले. त्र्यं. ग. बापट; प्रका. द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २; मूल्य ६ आणे.

११ श्रीकृष्ण-कथामृत (महाकाव्य)—ले. संतकवि श्रीगणुदास; प्रका. अ. दा. आठवले, ९९० सदाशिव, पुणें २; मूल्य ५ रु.

१२ हृदयगीत (कविता)—सौ. निवेदिता विर्नोत; प्रका. रामचंद्र, रायटर-गल्ली, धारवाड; मूल्य २ रु.

१३ चिडिया घर—ले. मानू शिरधनकर; प्रका. अभिनव प्रकाशन, मुंबई १४; मूल्य ३ रु.

१४ कहाण्या संग्रह—संपा. सौ. सुधाताई रायकर; चंद्रिका प्रकाशन, दहिसर, बोरीवली (जि. ठाणें); मूल्य ८ आणे.

१५ भक्त प्रल्हाद—ले. शिवराम वाशीकर; जयहिंद प्रकाशन, मुंबई २; मूल्य ४ आणे.

१६ विराणी (कथा)—ले. पं. महादेवशास्त्री जोशी; विद्या प्रकाशन, ६७८ सदाशिव, पुणें २; मूल्य २॥ रु.

१७ गांधीवादाचें समर्थन—ले. ग. य. चिटणीस; युगवाणी प्रकाशन, १२ त्रिभुवन रस्ता, मुंबई ४; मूल्य ८ आणे.

१८ श्री तुकारामांचे अभंग—संपा. बा. ग. परांजपे; प्रका. ध. रा. गाडगीळ, पुणें ४; मूल्य १० रु.

१९ शिवारीं चला (क्रांतिगाणीं)—प्रका. लोकसाहित्य, ८७ शिवाजी पार्क, मुंबई २८; मूल्य ८ आणे.

२० मराठी माध्यमिक बीजगणित—प्रका. नागपूर विद्यापीठ, नागपूर; मूल्य ६। रु.

२१ प्रेमवेडी (कादं.)—ले. व्यं. अ. पै. रायकर; सागर साहित्य प्रकाशन, १४ त्रिभुवन रस्ता, मुंबई ४; मूल्य ३॥ रु.

२२ संत तुकाराम—ले. पां. श्री. टिल्लू; जयहिंद प्रकाशन, ठाकूरद्वार, मुंबई २; मूल्य ४ आणे.

२३ मर्मभेद—ले. ग. वि. केतकर; ना. र. आठवले, ४३७ क, नारायण, पुणे २; मूल्य ३ रु.

२४ सांघि (प्रातिनिधिक कवितासंग्रह)—सरनोबत प्रकाशन, ४७६ शनिवार, पुणे २; मूल्य ४ रु.

२५ बालराजे—ले. डॉ. कृ. श्री. म्हसकर; जयहिंद प्रकाशन, झावबाची वाडी, मुंबई २; मूल्य २ रु.

२६ कै. राजारामशास्त्री भागवत (लेखसंग्रह)—संपा. दुर्गा भागवत, अभिनव प्रकाशन, मुंबई १४; मूल्य ५ रु.

२७ आनंदभैरवी (कविता)—कवि. बा. भ. बोरकर; प्रका. पां. रा. ढमढेरे, सदाशिव, पुणे २; मूल्य २॥ रु.

२८ शंभूराजे (नाटिका)—ले. ना. ध. कोचरेकर; जयहिंद प्रकाशन, झावबाची वाडी, मुंबई २; मूल्य ८ आणे.

२९ माओ-त्से-तुंग (आत्मकथा)—संपा. स. ह. मोडक; लोकसाहित्य, ८७ शिवाजीपार्क, मुंबई २८; मूल्य १ रु.

३० परिमार्जन (कादं.)—ले-ग. र. इनामदार, प्रका. काकोडकर ग्रंथ भांडार, सांगली; मूल्य १॥ रु.

३१ भाग्याचा दिवस (नाटक)—ले. भार्गवराम बापट; प्रका. के. वा. जोशी, ६७८ सदाशिव, पुणे २; मूल्य १॥ रु.

३२ प्राचीन भारतीय विद्यापीठें—ले. ना. गो. तवकर, प्रका. इंडियन इन्स्टि. ऑफ एज्यु, ११ हार्निमन सर्कल, मुंबई १; मूल्य रु. ५॥=

३३ दसरादिवाळी व गिरणबाबू—ले. कृ. भा. बाबर व ग. ल. ठोकळ; प्रका. सरोजिनी बाबर, १९६।२४ सदाशिव, पुणे २, मूल्य प्रत्येकी ६ आणे.

३४ अजिता (कादं.)—ले. सरोजिनी बाबर; प्रका. ग्रामीण प्रकाशन संस्था, भिलवडी (सातारा); मूल्य ३॥ रु.

३५ माझा नाना—ले. व प्रका. सौ. वेणूबाई आजरेकर; पी. वाय. सी. पुणे ४; मूल्य ३॥ रु.

३६ न्यायमूर्ति रानडे—संपा. अ. बा. मराठे; प्रका. केमकर आणि मं. मुंबई ४ मूल्य १। रु.

३७ श्रीकृष्णार्जुन संवाद—निवेदक. अ. बा. मराठे; प्रका. परचुरे पुराणिक मं; माधवबाग, मुंबई ४; मूल्य १॥ रु.

३८ सत्यव्रत भीष्म—ले. अ. बा. मराठे; निर्णयसागर प्रेस, मुंबई २; मूल्य १रु.

३९ श्री चक्रधर व महानुभाव—ले. गं. म. ठवरे, प्रका. आध्यात्मिक साहित्य प्रकाशन,सुभाषचंद्र रस्ता, नागपूर; मूल्य १रु.

४० सामान्य-विज्ञान प्रवेश—(भाग १) ले. व प्रका. डॉ. गो. म. भट व श्री. पं. ना. साठे; ६२० सदाशिव; पुणे २; मूल्य १॥। रु.

४१ ध्येयासाठीं (नाटक)—ले. वि. स. गिरप; प्रका. द. पुं. मोरजे, १२ होमजी स्ट्रीट, मुंबई १; मूल्य १॥ रु.

४२ मिश्रविवाह—ले. व प्रका. य. ह. कदम, शहापूर (बेळगांव); मूल्य १ रु.

४३ वेलांचीं पानें—कवि त्र्यं. गं. घारपुरे; प्रका. डॉ.कृ.गो.गोसावी, मिरज, मूल्य ८आ.

४४ राज्याभिषेक चंद्रिका—ले. दा. ना. आपटे; प्रका. ना. कृ. कारे, दांडिया बाजार, बडोदें; मूल्य २॥ रु.

४५ पहिला कवि—ले. सी. म. बापट; प्रका. नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; मूल्य १॥। रु.

४६ वैष्णवजन (नाटक)—ले. दा. न. शिखरे; प्रका. द. रा. कानेगांवकर, १९८।७ सदाशिव, पुणे २; मूल्य १२ आणे.

४७ श्री विद्यानंद स्वामी महाराज (चरित्र)—ले. पां. श्री. आपटे व दा. गो. पाटील; प्रका. रा. नं. सोनी, येवला (नाशिक); मूल्य ४ रु.

**४८ नव्या जगाचे निर्माते**—ले. डॉ. बा. मो. कानिटकर; प्रका. द. रा. कानेगांवकर, १९८।७ सदाशिव, पुणें २; मूल्य १० आणे.

**४९ झिलवा राणो** ( नाटक )—ले. यशे गोंयबाब; प्रका. के. एस्. नायक, गोमंतक प्रिं. प्रेस, मुंबई ४

**५० समश्लोकी मराठी भगवद्गीता**—ले. व प्रका. श्री. भा. गोखले, ४२६ पेठभाग, सांगली; मूल्य ८ आणे.

**५१ ज्ञानेश्वर** ( त्रैमासिक )—संपा. व प्रका. वि. त्र्यं. शेटे; याज्ञवल्क्य आश्रम, कसबा, पुणें २; वा. व. ३ रु.

**५२ तूं भेटायला नको होतास** (कादं.) ले. सरोजिनी बाबर; प्रका. रा. रा. शहा, महाद्वार, पंढरपूर; मूल्य ३ रु.

**५३ रांगणेकर आणि मराठी रंगभूमि** ले. द. रा. गोमकाळे; प्रका. सुविचार प्रकाशन मंडळ, लि. धंतोली, नागपूर; मूल्य १ रु.

**५४ डॉ. खरे चरित्र** ( भाग २ )—ले ज. रा. जोशी; प्रका. सुविचार प्रकाशन मंडळ, लि. धंतोली, नागपूर १; मूल्य ७ रु.

**५५ हद्दपार** (कादं.)—ले. श्री. ना. पेंडसे, प्रका. बा. वि. भट, साहित्य सहकार संघ लि. मुंबई ४; मूल्य ३ रु.

---

## सरदार पटेल निधनदुःख

सरदार पटेलांच्या निधनाची दुःखद वार्ता समजतांच परिषदेतर्फे अध्यक्ष राजकवि यशवन्त यांनी दुःख व्यक्त करणारी तार श्री. डाह्याभाई पटेल यांना पाठविली.

---

### वर्गणी—सूचना

**विनंती :**— या वर्षाची तिसरी तिमाही संपली आहे. ज्या सभासदांकडे वर्गणी यावयाची आहे, त्यांनी कृपाकरून ती पाठवावी. बाकीदार सभासदांकडे 'पत्रिका' अंक व्ही. पी. ने पाठविला होता. कांही सभासदांनीं स्वीकार न केल्यामुळें अंक परत आले. या सभासदांनीहि वर्गणी पाठवावी अशी विनंती आहे. कांही कारणांमुळे ज्यांना सभासदत्व नको असेल त्यांनी तसें कळविल्यास सोयीचें होईल.

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास (मानभावअखेर)
लें०— बा. अ. भिडे. मूल्य रु. १॥. सभासदांस रु. १८=. (ट. ख. नि.)

२ महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-अितिहास—लें० म. म. प्रा. द. बा. पोतदार
मूल्य रु. ३ सभासदांस रु. १॥ (ट. ख./निराळा).

३ प्राचीन पद्यवेंचे भाग १ व २ (प्राज्ञ परीक्षेस लावलेले)— मूल्य रु. २।=.

४ वाङ्मयीन समालोचन (१९४७) मूल्य रु. २. सभासदांस रु. १॥.

५ शुद्धलेखन नियम—मूल्य १॥ आणा. (ट. ख. निराळा)

६ वाङ्मयीन—वाद (परिषद्—पुरस्कृत)— मूल्य रु. ३ सभासदांस रु.२८=.

७ संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति—ले. प्रा. गं. बा. सरदार,
मूल्य २ रु. (सभासदांस १॥ रु.; ट. ख. वेगळा.)